# भानगड गल्ली

[ १९३० सालच्या चळवळीचा इतिहास ]

भार्गवराम विठ्ठल वरेरकर



मुंबइ येथील १९३० च्या कायदेभंगाच्या चळवळीचा इतिहास लिहितांना इतिहासापेक्षां कादंबरीचें स्वरूप देणें मला जास्त आकर्षक वाटलें. हा इतिहास सांगोपांग लिहिला तर हजार–बाराशें पानांची कादं· बरी होऊं शकेल. आज एवढी मोठी कादंबरी प्रसिद्ध करेंग शक्य नाहीं म्हणून इतिहासाची सर्वसाधारण रुपरेखा ध्यानीं येईल इतक्या बेतानेंच या कादंबरीची रचना केली आहे.

प्रस्तुत कादंबरी हा या मालेंतील पहिला भाग आहे. दुसरा भाग 'लॅबर्नम रोड' या नांवाखालीं क्रमानें प्रसिद्ध होणार आहे.

कांहीं प्रसंगाच्या कालानुक्रमाची उलटापालट झालेली दिसेल. ती चुकून झालेली नसून बुद्धीपुरस्सर केलेली आहे. प्रत्यक्ष प्रसंगांपेक्षां कालानुक्रमाचें महत्व कादंबरीच्या दृष्टीनें महत्वाचें नाहीं.

हाजी कसम वाडी, मुंबई ७
२०–३–३९.

भा. वि. वरेरकर.

---

या कादंबरीच्या मुखपृष्ठावर 'नवजीवन' बोलपटांतील हंसा वाडकर हिचा ब्लॉक छापण्याची परवानगी दिल्याबद्दल 'बॉम्बे टॉकीज़' च्या चालकांचा मी आभारी आहें.

——प्रकाशक

# १

सुखवस्तु जीवनाची प्रत्येक माणसाची कल्पना त्याच्या त्याच्या मनोवृत्तावर अवलंबून असते. लक्षाधीश माणूस लाखों रुपये मिळवून सुद्धां सुखवस्त् होऊं शकत नाहीं, तर दरमहा पंचवीस रुपये मिळविणारा अल्पसंतुष्ट पांढरपेशा कुणाही लक्षाधीशापेक्षांही ऐषआरामांत राहूं शकतो.

पंचवीस रुपयांच्या प्राप्तींत ऐषआरामांत काय राहायचें, असें कुणाला वाटेल. पण समाधान असते तें मानून घेण्यांत. सर्वांनाच हे कळत नाहीं. माझी वृत्ती अशाच प्रकारची सुरवातीस असे. समाधानाचा मी मोठा भोक्ता आहें. जगाच्या उलाढाली, व्यवसायाची दगदग, राजकारणाचे उसळते डोंब, असल्या भानगडींत पडण्याची मला मुळींच आवड नाहीं. माझ्या वडिलांनीं मृत्युकालीं माझ्या नावें जी कांहीं रक्कम ठेवून दिली होती तिच्या व्याजांत स्वतःचा चरितार्थ चालवित मी सुखानें कालक्रमण करीत आलों आहें.

शिक्षणाची मला फार आवड होती. बऱ्याचशा पदव्या मिळवाव्य असें जरी मनाला वाटत होतें तरी त्यासाठीं करावे लागणार उपद्व्याप मला त्याज्य वाटत. काय करायचें ह्या पदव्या घेऊन ? पदव्यांसाठीं चाललेली धडपड नुसती नोकरीकरितांच न ?—

मला नोकरी करायची नाहीं. पदवीधर होण्यासाठीं जो अभ्यास करायचा तो घरीं बसून मला करतां येत होता. इतक्या सुलभ रीतीनें जी गोष्ट शक्य होती तिच्यासाठीं पैशाचा, कालाचा आणि परिश्रमाचा अपव्यय

कां करावा, असें मला वाटे.

मॅट्रिक झाल्यानंतर कांहीं दिवस मी कॉलेजांत गेलों. माझें मन तिथें रमेना. माध्यमिक विद्येंत जे अध्यापक होते त्यांची वृत्ती मला पटेना. त्यांच्या शिक्षणाची पद्धतिही मला योग्य वाटेना. मी कॉलेज सोडलें आणि घरीं बसलों.

माझ्या घरीं दुसरें कुणीच नव्हतें. मला कुणी भाऊ व बहिण नव्हतीं. आई माझ्या लहानपणींच वारली होती. तिची ओळखसुद्धां मला झाली नव्हती. माझे वडील आणि मी अशीं दोनच माणसें आम्हीं आमच्या या स्वतःच्या घरांत राहत होतों. केव्हां आम्हीं खाणावळींत जात असूं, केव्हां स्वयंपाक करीत असूं. केव्हां एकादा स्वयंपाकीदेखील, ठेवित असूं. जेवणाखाणांतलें हें वैचित्र्यही आम्हांला चांगलें मानवलें होतें.

माझे वडील पूर्वीं नोकरींत होते. नोकरी सोडून ते व्यापारांत पडले. एका काठेवाडी मित्राच्या सहकार्यानें कापूस बाजारांत त्यांनीं बरीच उलटापालट केली. त्या भानगडींत त्यांना सांपत्तिक जखमाही झाल्या. पण हें जग सोडतांना जन्मभर मला नोकरी केल्याशिवाय जगतां येईल एवढी तरतूद त्यांनीं करून ठेविली.

माझा स्वभाव फार एकलकोंडा आहे. ज्या जागीं आम्हीं राहतों, म्हणजे माझें स्वतःचें घर आहे, त्याच्या आजूबाजूला पांढरपेशा लोकांची वस्ती मुळींच नाहीं. या गल्लीच्या नाक्यावर जी इंग्रजी पाटी आहे तिच्या-वर Bhangad lane असें लिहलेलें आहे. कुणी त्याला भांगड गल्ली असेंही म्हणतात. पण मी त्या पाटीच्या इंग्रजी अक्षरांवर जोर देऊन 'मी भानगड गल्लींत राहतों ' असें अभिमानानें सांगत असतों.

आणि ही गल्लीसुद्धां तशी भानगडीची नाहीं असें म्हणतां यायचें नाहीं. संध्याकाळीं या गल्लींत कधीं मारामाऱ्या झाल्या नाहींत असा एकही दिवस गेला नाहीं. वस्ती सारी दारुबाजांची. कुणी मोलमजुरीचीं कामें करतात, कुणी कुठें कारखान्यांत नोकर आहेत, कांहीं पानवाले, कांहीं विडीवाले, कांहीं फेरीवाले हेच माझे शेजारी सोबती. मीच तेवढा एकटा पांढरपेशा.

हे माझे शेजारी एरवीं कसेही असले तरी आम्हाला मोठ्या मानानें

वागवित आले आहेत. माझ्या वडिलांचा त्यांना मोठा धाक असे. कधीं एकादी मारामारी झाली आणि माझे वडील तितक्यांत तेथें हजर झाले तर एका क्षणांत जिकडे तिकडे सामसूम होई. तो धाक ठेवण्याची ताकद जरी माझ्या अंगीं नाहीं तरीही जो मान माझ्या वडिलांना मिळे तोच मान मला देऊन अजूनपर्यंत त्यांनीं आमच्या घराण्याचा बोज ठेवला आहे.

तेव्हां अशा जागीं येणार तरी कोण? हायस्कुलांत असतांनासुद्धां मी फारसे मित्र जोडले नाहींत. परिचय झालेले विद्यार्थी या अशा गल्लींत यायला तयार नसत. मीच होऊन कुठें गेलों तर जायचा. कॉलेजचा संबंध लवकरच संपला; त्यामुळें मित्र असे कोणीच जोडले गेले नाहींत.

माझी बसण्याची आवडती ठिकाणें दोन. एक पेटीट लायब्ररी आणि एक रॉयल एशियाटीक सोसायटी. या दोन्ही संस्थांत येणारीं सर्व माणसें मला ओळखतात. ठराविक खुर्चीवर, ठराविक वेळीं, ठराविक दिवशीं मी तिथें असायचाच. या माझ्या वक्तशीरपणामुळेंच मी सर्वांच्या परिचयाचा झालों आहें.

पण परिचय मात्र कुणाचाच झाला नाहीं—कुणाचा परिचय करून घ्यायचा मी प्रयत्नही केला नाहीं. एक 'बुकवर्म' रोज येतो, वाचित बसतो आणि निघून जातो, एवढेंच सर्वांना माहीत होतें.

जगाशीं जरी मी इतका फटकून वागत होतों तरी प्रख्यात होण्याचें माझ्या नशिबीं होतेंच होतें. मी लेखक नाहीं, वक्ता नाहीं, सार्वजनिक कार्यकर्ता नाहीं, पण माझ्या हातून जी एक विशेष गोष्ट घडली त्यामुळेंच मी प्रख्यात होऊन बसलों.

पेटीट लायब्ररींत ज्या ज्या दिवशीं, मी जाऊन वाचायला बसत असें त्या त्या दिवशीं, एक मुलगी माझ्या सारखीच येत असलेली मला दिसून येई. मी पहात असें, केव्हां केव्हां ती वाचीत असलेलें पुस्तक खालीं धरून कितीतरी वेळ माझ्याकडे टक लावून बघत असे

मला आश्चर्य वाटे. अगदीं स्पष्ट सांगायचें म्हणजे कोणत्याही तरुणीच्या नजरेंत भरण्याइतकी कोणतीही शारिरीक अनुकुलता निसर्गानें मला दिलेली नाहीं. मी कुरूप नसलों तरी देखणा मुळींच नाहीं. अशक्त नसलों तरीही कोणत्याही फिजिकल् कल्चरीस्टच्या कसोटीला उतरेन अशी

माझी देहयष्टी नाहीं आणि विशेष हें कीं माझा वर्ण अगदीं काळया सांव-ळयांत जमा होण्यासारखा आहे.

म्हणूनच मला आश्चर्य वाटे, कीं या तरुण मुलीनें माझ्याकडे इतकें का रोखून पहावें ? कुणाशीं परिचय करण्याची माझी वृत्ति नाहीं खरी तरीही केव्हां केव्हां माझ्या मनांत येई, कीं तिला सरळ सरळ विचारावें.

मनाला संकोच वाटे. काय विचारायचें तिला ? पुस्तक बाजूला करून माझ्याकडे कां पाहतां, असें कां विचारायचें ? तसा प्रश्न करायचा धीर मला होईना.

पाहीना कां ! त्यांत माझें काय बिघडत होतें ? तसेंच काही वैशिष्ट्य माझ्या ठायीं तिला दिसलें असेल ! सौंदर्यच कांहीं आकर्षक असतें असें नाहीं कुरूपतेची परिसीमा मुद्धां मान वळवायला माणसाला भाग पाडते.

तसेंच हें नसेल कशावरून ? कदाचित् माझी मुद्रा तिला विलक्षण वाटली असेल—कदाचित् माझा चेहराही तिला कुरूप वाटला असेल. मी आरशांत पाहिलें. माझ्या नजरेनें मला त्यांत वैशिष्ट्य दिसलें नाहीं. पण स्त्रियांची दृष्टि काय असते कुणाला ठाऊक ?

घरात चार बायका असलेल्या प्रपंचात मी वाढलेला नव्हतों. वाङ्मयांत वाचलेल्या स्त्री जातीच्या शारीरिक आणि मानसिक वर्णनापलिकडे स्त्री-हृदयाची मला परीक्षा नव्हती. आणि विशेष आश्चर्याची गोष्ट म्हणजे ही, कीं स्त्री-जातीबद्दल तारुण्यसुलभ आकर्षणही माझ्या परिचयाचें नव्हतें.

हळूहळू मी तिच्याकडे पाहण्याचें सोडून दिलें. क्वचित मधून डोळा देऊन पाहिलें तर पुस्तक बाजूला सारून ती माझ्याकडे पहात असल्याचें माझ्या नजरेला येई. डोळ्याला डोळा दिला तरीही ती दृष्टि फिरवीत नाही असें दिसून आल्यामुळें मी चुकूनसुद्धां तिच्याकडे पहायचें नाहीं असा विचार केला.

बव्हशीरपणाबद्दल जरी मी अगदीं काटेकोर होतो तरीही या दोन्ही संस्थांत जाण्याचे दिवस बदलावे असें मला वाटलें. आपण वाचीत बसलों आहोंत आणि ती आपल्याकडे टक लावून पहाते आहे ही कल्पनाच मला सहन होईना. मी पेटीट लायब्ररींत जाण्याचा दिवस बदलला तरीही ती

तिथें हजर होती.

मला वाटलें ती दररोज लायब्ररींत येत असेल. पुन्हां मी माझ्या बक्कशीरपणावर आलों.

एके दिवशीं एक विलक्षण प्रसंग घडून आला. रॉयल एशियाटिक सोसायटींतून आणलेलीं कांहीं पुस्तकें त्या दिवशीं माझ्याजवळ होतीं. तीं बाजूला पडलीं होतीं. मी एक ' मॅगझिन् ' घेऊन वाचीत होतों. बसलेल्या जागेवरून उठून ती माझेजवळ आली आणि तीं पुस्तकें उचलून घेऊन चालूं लागली.

मी कांहींच बोललों नाहीं. तिच्या धीटपणाचा मला राग आला. अशीं पुस्तकें घेऊन मी येत असें. पण तीं कुणीच मला विचारल्याशिवाय अशीं उचललीं नव्हतीं. एकदां चांगलें सणसणीत बोलावें असें माझ्या मनांत आलें—पण असें बोलणेंच परिचयाला कारणीभूत होईल या भीतीनें मी मूग गिळून स्वस्थ बसलों.

पण तिच्या धीटपणाची मजल एवढ्यावरच थांबली नाहीं. माझ्या हातांतील पुस्तक आपल्या हातानें बाजूला सारून ती म्हणाली " रॉयल एशियाटिकचे मेंबर आहांत वाटतं ?"

मी नुसता हुंकार दिला—मी आंतून अगदीं त्रासलेला होतों.

" काय आहे वर्गणी तिथली ?" तिनें विचारलें.

आतां बोलण्याखेरीज गत्यंतर नव्हतें. सरळ उत्तर द्यायचें नाहीं असें ठरवून मी म्हटलें, " सरळ जाऊन विचारा ना तिथंच."

" पण तुम्हींच सांगितलं तर काय बिघडेल ?" तिनें हंसत हंसत विचारलें.

कधीं न घडलेला परिणाम माझ्या मनावर झाला. अशा रीतीनें माझ्याकडे पहात कुणीच हंसलें नव्हतें. एक क्षणमात्र हा परिणाम झाला.

पुन्हां मी भानावर आलों आणि म्हणालों, " तिथं मेंबर होणं सोपं नाहीं. निवडून यावं लागतं. आधीं कुणीतरी शिफारस करावी लागते-कुणीतरी म्हणजे असलेल्या मेंबरनं."

" अस्सं !" ती पुन्हा तसेंच हंसत म्हणाली. " मग माझी कराल का शिफारस ?"

"मला खोटं करायचं नाहीं!" मी थोडेसें कुऱ्यानें म्हटलें "तुम्हाला मी ओळखतसुद्धां नाहीं."

"कां बरं!" ती शेजारच्या खुर्चीवर बसत, अगदीं सलगीने म्हणाली. "रोज पहातांच कीं मला इथं!"

"मला कुणाची शिफारस करायची नाहीं." मी तुटकपणानें उत्तर दिलें.

"भारीच रागावलांत कीं!" ती म्हणाली. म्हणतांना तिनें असा कांहीं अविर्भाव आणला, अशी मान तिरपी केली, डोळ्यांची बुबुळें अशी कांहीं चाळवलीं, ओंठाच्या जिवर्णाला अशी कांहीं मुरड घातली, कीं ती पहातांच मी कासावीस होऊन गेलों. रागानें कांहींतरी उत्तर द्यावें—अगदीं ताडफाड करून टाकावें असें माझ्या मनांत आले होतें.

पण माझी जीभ रहीनाच. मी म्हटलें, "रागवायचं काय? तुमची माझी ओळखदेख नाहीं, कुणी पुरुष असता तर गोष्ट निराळी होती, पण परिचय नसतांना तुम्ही मला असं विचारावं हें मला तरी पसंत नाहीं."

"कां पसंत नाहीं?" टेबलावर नाजुकशी चापटी मारीत तिनें म्हटलें, "हा भेदभाव तुमच्या मनांत कां येतो? तुम्ही एक वाचक आहांत, मीही एक वाचक आहें. इतक्या आस्थेवाईकपणानं इथं वाचीत बसणारा कुणीही माणूस मला कधींच दिसून आला नाहीं. म्हणूनच माझी नजर तुमच्याकडे वळली. तुम्ही माझ्या डोळ्याला डोळा द्यायचं चुकवित होतां, कां? स्त्री म्हणजे काय कुणी माणूस नव्हे? कां हा भेदभाव तुमच्या मनांत येतो?"

"कुणी पुरुषाशीं तरी कुठं मी बोलतों?" मी उत्तर देऊन चुकलों. माझी मलाच शरम वाटली. इतक्या काकुळतीला यायचं कांहीं कारण नव्हतें."

"तेंच मला आवडलं नाहीं. नुसत्या वाचनांतच का समाधान असतं? वाचल्याची चर्चा नको का करायला. कुठल्यातरी पुस्तकांत कुणीतरी कांहींतरी विचित्र लिहीलं अन् तें नाहीं पटलं तर तें नको का दुसऱ्याला विचारायला—नको का त्याची चर्चा करायला?"

" पण तुम्हीं तसं कुठं विचारलं ?" मी पुन्हां बोलून गेलों. बोलल्यानंतर माझी चूक माझ्या लक्षांत आली, मी तिला उत्तेजन देत होतों.

" कसं विचारायचं ?" ती अगदी नाजूकपणानें म्हणाली, "शंभर वेळां मला प्रश्न सुचत होते. बोलावं, बोलावं असं वाटत होतं. बोलल्याशिवाय समाधान होत नाही माझं. पण तुमची डोळयाला डोळा द्यायची सुद्धां तयारी नाहीं तिथं विचारायचं कसं ? इथं माणसं येतात. पण बहुतेक सारे पारशी किंवा गुजराथी. महाराष्ट्रीय असे तुम्ही काय ते एकच !"

" महाराष्ट्रीयच कशाला हवा ?" मी म्हटलं. "इंग्रजी येतं ना तुम्हांला ? पारशाला विचारावं, गुजराथ्याबरोबर बोलावं—"

ती इतकी विलक्षण हसली कीं मला पुढें बोलायलाच सुचेना.

माझ्या काळजाचें पाणी पाणी झालें.

मी धीर करून विचारलें, " कां, हंसतां कां ?"

" एवढंसुद्धां कळत नाहीं तुम्हांला ?" गंभीर होण्याचा प्रयत्न करीत ती म्हणाली. " कॉलेजांत होतां कां कधीं ? किती शिक्षण झालंय तुमचं—मला वाटतं तुम्ही कॉलेजांत नव्हतां."

" कॉलेजचा काय संबंध इथं ?"

" कॉलेजचा काय संबंध ! मग तर तुम्ही नव्हतांच कॉलेजांत. माणसाच्या आयुष्यांत जे पुष्कळसे फरक होतात ते या कॉलेजच्या वातावरणांत असतांनाच. मी पाहिलं आहे, कॉलेजांत गेलेलीं आणि कॉलेजांत न गेलेलीं माणसें यांच्यांत जमीन अस्मानाचा फरक असतो. कांहीं कांहीं गोष्टी समजतच नाहींत त्यांना. विशेषतः—पण जाऊं द्या—तुम्हीं नव्हतां ना कॉलेजांत ?"

" चार सहा महिने होतों." मी अगदीं ओशाळून म्हणालों.

" मला वाटलंच तें—" असें म्हणून ती उभी राहिली. पुढें काय बोलावें हें मला सुचेना. बोलावें कीं न बोलावें याचाहि निश्चय करतां येईना. माझी इच्छा नसतांना हा परिचय घडून येत होता. आपणहून कुणाशीं परिचय करण्याची माझी प्रवृत्ति नसतांही या तरुण मुलीनें—पुरुषापासून सुद्धां दूर असणारा मी—त्या माझ्याशीं परिचय करण्याचा प्रयत्न करावा आणि मी त्याला बळी पडावं !

माझा मलाच राग आला माझ्या कांहीं शब्दांचा,—

" मग येतां ना ? आतांच जाऊं आपण. फॉर्म भरून देऊं तिथला. मग रिझल्ट केव्हां लागायचा तेव्हां लागेल. प्रयत्न करायला काय होतं --"

" कुणी Black Ball टाकला तर !" मी तिच्याकडे न पाहातांच म्हटलें.

" टाकला तर टाकला. मला नाही वाटत तसं. चला." असें म्हणून ती निघायला सरसावली. अगदीं मनाच्या विरुद्ध मीही तिच्या मागोमाग निघालों.

रस्त्यावर येतांच ट्रॅम गांठण्यासाठीं मी पलिकडच्या बाजूला जाण्याचा प्रयत्न करीत होतों. तेव्हां माझ्या कोटाला धरून ओढून ती म्हणाली, " थांबा, माझी 'कार' आहे."

मी थक्क झालों. बरीच श्रीमंत असावी !

'कार'जवळ येऊन पाहिले तर तिथें ड्रायव्हर नव्हता. ड्रायव्हरच्या जागीं ती स्वतःच बसली. आणि पुढच्या सीटवर मला ओढून तिनें बळेंच बसविलें.

मी अगदीं शरमिंदा होऊन गेलों होतों. एका अपरिचित तरुणीच्या शेजारीं बसून जात असतां रस्त्यांत कुणी आपल्याला पाहिलें तर त्याला काय वाटेल ? माझ्या परिचयाचीं अशीं माणसें कुणी नव्हती खरीं-त्या रस्त्यांत भेटण्याजोगीं तर मुळींच नव्हती—तरीही मला शरम वाटूं लागली.

मुठीत जीव धरून मी तिच्या शेजारीं बसलों होतों-अगदीं अंग चोरून बसलों होतों. गाडी धांवत असतांना ती मधून मधून तिरप्या नजरेनें माझ्याकडे पाहात होती आणि मी तिच्या डोळ्याला डोळा द्यायचें शक्य तेवढें चुकवित होतों.

—x—

# २

कधीं न होणारी गोष्ट आमच्या भानगड गल्लींत होऊं लागली होती. गल्ली अरुंद खरी पण तिची मोटर कांहीं फारशी मोठी नव्हती.

पहिल्यानेंच ती मोटर घेऊन गल्लींत आली. त्यावेळीं गल्लींत राहाणारीं सारीं माणसं आश्चर्यचकित झालीं. एक बाई—बाई कसली मुलगी—त्यांतून महाराष्ट्रीय, आणि स्वतः मोटर चालवते याचें सर्वांनाच मोठें आश्चर्य वाटलें. डोंबाऱ्याच्या खेळालाही जितकी गर्दी झाली नसती इतकी गर्दी त्या मोटारीभोंवती जमली.

मला आश्चर्य वाटलें तें हेंच, कीं त्या गर्दी करणाऱ्यांवर ती चिडली नाहीं. सर्वांकडे पाहून ती मोठ्या आपुलकीनें हंसत होती. एक दोन व्रात्य पोरें मोटारीवर चढून तिच्या हातचें चाक फिरवूं लागलीं. तरीही तिनें त्यांना हटकलें नाहीं. एका मुलीनें तिच्या साडीचा पदर हातीं धरून पाहायला सुरवात केली—किंमत सुद्धां विचारली—तरीही ती रागावली नाहीं. आपापल्या परीनें प्रत्येकजण तिला कांहीं ना कांहीं प्रश्न विचारी आणि हंसत हंसत ती त्याचें उत्तर देई.

मला राग येई तो या तिच्या हंसण्याचा. कारण असो वा नसो उगीच हंसायचं कां? सहज बोलतांना हंसण्याचा परिणाम दुसऱ्यावर काय होतो याची तिला फिकीर नसे. नुसतें हंसायचें म्हणून ती हंसत असे. केव्हां केव्हां मला शंका येई, कीं बोलायला तोंड उघडलें म्हणजे नकळत हंसण्याची छटा तिच्या चेहऱ्यावर येते कीं काय?

दररोज ती येऊन मला घेऊन लायब्ररींत जात असे. पुस्तकांच्या

निवडींत तिची माझी आवड पुष्कळशी जुळती होती. त्या आवडीमुळेच माझ्यावर एक संकट येत होतें.

तिच्या प्रश्नांची उत्तरें देणं मला भाग पडत असे. एकदां तिच्या प्रश्नाचा भडिमार सुरू झाला म्हणजे माझा जीव अगदीं मेटाकुटीला येई.

पहिल्या पहिल्यानें मला या प्रश्नांचा राग येत असे खरा. पण हळू-हळू ती गोष्ट माझ्या अंगवळणी पडूं लागली—नव्हे मला प्रश्नाचीं उत्तरें देण्यांत एक प्रकारचा आनंद वाटूं लागला. यापूर्वी मी वाचीत असें, वाचल्याचा विचार करीत असें, विचार करतां करतां लेखकाच्या मताशीं आपल्या मनाची सरणी ताडून पहात असे आणि त्यांतच मला आनंद वाटत असे. पण तो आनंद अपुरा होता हें या प्रश्नानंतर मला कळून आलें. मी विचार करीत असें खरा परंतु तो विचार सर्वांगीण नव्हता. तिच्या प्रश्नाचीं उत्तरें देतांना मात्र अडून पडावें लागे त्यामुळेंच हें माझ्या ध्यानीं आलें. प्रश्नाचीं उत्तर देण्यासाठीं म्हणून मी यानंतर वाचूं लागलों आणि त्यामुळें माझा वाचनाचा आनंद द्विगुणित झाला.

माझे कुणी मित्र नव्हते याबद्दल मला अभिमान वाटला असेल, तर याच वेळीं, नाहींतर माझी थट्टा झाली असती.

आजुबाजूचीं गल्लींतील माणसें घालून पाडून बोलत तें माझ्या कानीं येई. पण तीं माणसें मोठीं सरळ मनाची होतीं. त्यांच्या उद्‌गारांत सुशिक्षित माणसांच्या उद्‌गारांचा विपारीपणा नव्हता आपल्या गल्लींतला एक पांढरपेशा माणूस एका बाईबरोबर रोज मोटारींतून जातो. याचेंच त्यांना कौतुक वाटत असे आणि त्या कौतुकाच्या अनुसंधनानेंच त्यांचें ते उद्‌गार निघत असत. त्या उद्‌गारांत खवचटपणा होता—कुत्सितपणा नव्हता.

शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या या उद्गारांमुळें माझ्या मनावर कांहीं परीणाम होत नव्हता. झालाच तर तो वाईट नव्हता. हळूहळू मला या आमच्या चिमुकल्या सफरींचा अभिमान वाटूं लागला होता. लायब्ररींतून निघाल्या-बरोबर केव्हां केव्हां आम्ही साऱ्या मुंबईला वेढा घालीत असूं. केव्हां कफ परेडवर, केव्हां अपोलो बंदरावर, तर केव्हां केव्हां बोरीवली, मालाडपर्यंत सुद्धां आम्ही मजला मारीत असूं. मोटर चालवित असतां तिच्या तोंडाची टकळी सारखी सुरू असे. महत्वाच्या विषयावर बोलण्याचें

अवधान संभाळतांना रस्त्यावरच्या गर्दीतून मोठ्या काळजीपूर्वक पण सहजगत्या ती मोटार चालवूं लागली म्हणजे मला तिच्याबद्दल आदर वाटूं लागे. अडचणीच्या वेळीं मी घाबरून जाईं पण ती मोठ्या शिताफीनें वळणें, वाकणं आणि अडथळे सांभाळीत सारखी बोलत मोटार चालवित असलेली दिसली म्हणजे मला तिच्याबद्दल अभिमान वाटूं लागे.

मला वाटलें, माझ्यासारखीच तिची वृत्ती एकलकोंडी आहे. पण एके दिवशीं तो माझा समज दूर झाला.

त्या दिवशीं ती मला आपल्या घरीं घेऊन गेली होती. मलबार हिलकडील एका प्रशस्त बंगल्यांत ती राहात असलेली पाहून मला आश्चर्य वाटलें. स्वतःची मोटार असणारी व्यक्ति मलबार हिलवर राहिली तर त्यांत कांहीं विशेष नव्हतें—तरीही मला आश्चर्य वाटलें.

बंगला फार मोठा होता. पण नोकर माणसाशिवाय घरांत कुणीच माणसें दिसून आलीं नाहींत.

उगीच कुणाची फाजील चौकशी करायची नाहीं अशी माझी वृत्ति आहे. विचारावें असें मनात आलें तरीदेखील माझी जिज्ञासा मी आवरून धरीत असें.

पण त्या दिवशीं तिनें स्वतः होऊनच आपली हकीगत सांगायला सुरवात केली.

सुखवस्तुपणाच्या कसोटीला जरी मी तिच्या पासंगाला पुरलों नसतों तरीही तिच्या माझ्या परिस्थितींत साम्य होतें. माझ्याप्रमाणेंच तिच्याही वडिलांनी तिच्या नांववर बरीच इस्टेट ठेवली होती—माझी ऐपत कांहीं हजारांची होती आणि तिची संपत्ती लाखांनीं मोजतां आली असती, एवढाच काय तो फरक.

ती बी. ए. झाली आहे हें कळलें त्यावेळीं मला मोठा धक्का बसला. एवढ्या लहान वयात बी. ए. झालेले मुलगेसुद्धां जिथें क्वचितच् दिसतात. तिथें तिनें एवढी मजल गांठलेली पाहून मला तिच्याबद्दल आणखीन् अभिमान वाटला.

एक वर्षापूर्वीच तिचे वडील मृत्यू पावले होते. जवळच्या नात्याचें असें तिलाही कुणी नव्हतें. ती एवढ्या मोठ्या बंगल्यांत एकटीच राहात

होती. जंगलांत वावरणाऱ्या एकलकोंड्या वाघिणीशीं मी क्षणभर तिची तुलना करून पाहूं लागलों.

तिचा बंगला केवढातरी अफाट होता. तेवढ्या जागेंत पांच पन्नास माणसें सहज राहूं शकलीं असतीं. कितीतरी खोल्या मोकळ्या राहिलेल्या होत्या. पण त्या सर्व नीटनेटक्या होत्या. प्रत्येक खोलींत कांहीं ना कांहीं सामान होतें. एवढ्या मोठ्या घरांत राहाण्याची कल्पनासुद्धां मला मोठी चमत्कारीक वाटली. माझा सारा जन्म लहानशा घरात राहाण्यांत गेला होता. मुंबईच्या वस्तींत मी स्वतःच्या घरांत राहातों आहें याचा मला अभिमान वाटत होता. पण त्या स्वतःच्या घरांतला बराचसा भाग भाड्यानें देऊन अगदीं एका माणसाला पुरेल एवढ्या चार खोल्यांच्या आवारांत मी राहात होतों. म्हणूनच या अफाट बंगल्यांत एकट्या राहा-णाऱ्या या तरुणीचें मला कौतुक वाटलें. चार खोल्यांची जागा वापरणेंसुद्धां जिथें मला उधळमाथळीचें लक्षण वाटत होतें तिथें येवढी मोठी जागा, एकच व्यक्ति — त्यांतूनही मुलगी — वापरते असें पाहून क्षणभर मी थक्क झाल्यावांचून राहिलों नाहीं. बंगला पाहून झाल्यावर आम्हीं मधल्या दिवाणखान्यांत येऊन बसलों. एका गोल मेजाभोंवती बऱ्याचशा खुर्च्या ठेवलेल्या होत्या. आम्ही बसलों होतों एका कोचावर.

तिनें बळेंच मला आपल्या शेजारीं बसवलें. मला संकोच वाटत होता. पण तिचें मन मोडण्याचें धैर्य मला होत नव्हतें.

ती सारखी बोलत होती. आपली हकीगत सांगत होती पण माझें लक्ष ठिकाणावर नव्हतें. अशा एखाद्या तरुणीच्या शेजारीं एकांतांत बसून मी गप्पागोष्टी करीन ही कल्पनासुद्धां कधीं माझ्या मनांत आली नव्हती. ती अननुभूत कल्पना प्रत्यक्ष घडत असलेली पाहून मी कावराबावरा झालों होतों—

"ऐकूं येतंय का?" ती जरा चिडून म्हणाली, "कुठं भटकतं आहे आपलं मन?"

मी भानावर येऊन म्हणालों, "जरा विक्षेप झाला खरा. मी मनाशीं तुलना करून पहात होतों. तुमच्या माझ्या परिस्थितींत पुष्कळसं साम्य आहे. फरक काय तो येवढाच, विद्वत्तेंत आणी श्रीमंतींत मी तुमच्या

मानानं बराच कमी आहे—परिस्थितींत साम्य असलं तरीं आमच्या वृत्तींत मात्र फारसं साम्य नाहीं. तुम्हाला बोलावंसं वाटतं—आपल्याशींच विचार करीत राहणं मला जास्त आवडतं. माझा मित्राचा परिवार फारसा नाहीं—फारसा कां मुळींच नाहीं—जिवाभावाचा म्हणायला सुद्धां एकही माणूस आपुलकीच्या भावनेनं माझ्याकडे पाहणारा नाहीं—" नकळत मी माझें मन तिच्यासमोर उघडें करीत होतों. याबद्दल क्षणभर माझा मलाच जरा राग आला तरीही मी पुढें सांगूं लागलों. "आणि मला त्याची जरूरीही भासली नाहीं. एवढ्या या अफाट मुंबईत एकलकोंडेपणानं रहाणंच मला आवडतं. खळबळणाऱ्या समुद्राच्या तळाशीं असलेला एखादा शांत बिंदू समुद्राशीं समरस होऊनदेखील अलग राहतो. तसाच मी अफाट विश्वाशी अलग राहून समरस व्हायचा प्रयत्न करतों आहें. जीवनाच्या प्रत्यहीं चाललेल्या झगड्यांत मिसळण्यापेक्षां द्रष्टा या नात्यानें तटस्थ राहून जगाकडे पहावं आणि मग जगाच्या उलाढालीनं आपल्या अंतःकरणांतल्या खळबळीशी तोडमिळवणी करून घ्यावी अशीच माझी मनःप्रवृत्ति आहे. मला वाटतं, माझ्याप्रमाणें तुम्ही देखील अशाच एकलकोंडेपणानं राहून—"

बाहेर घंटा वाजली. माझें बोलणें तेवढेंच राहिलें. ती चटकन उठून बाहेर गेली. त्या भल्या मोठ्या दिवाणखान्यांत मी एकटाच बसून राहिलों होतों—चोहोंकडे न्याहाळीत होतों. जिन्यावर पावलांचा सारखा धडधड आवाज सुरू झाला. बरीच माणसें येत असावीं असें वाटलें. खिदळण्याचा आवाज कानीं आला.

सातआठ तरुणांच्या घोळक्यांत चमकत जेव्हां ती दिवाणखान्याच्या दाराशीं आली. तेव्हां मी स्तंभित झालों.

सारेच तरुण होते—समवयस्क होते. कोणाच्याच डोक्याला टोपी नव्हती. सर्वांच्या अंगांत झुळझुळीत रेशमी सदरे होते. एकाच्याही अंगांत कोट नव्हता, मोठ्या नीट नेटकेपणानें विंचरलेले केंस सर्वांच्याच माथ्यांवर चमकत होते—आणि विशेष हें, कीं ते सारेच तरुण मोठे देखणे होते. क्षणभर माझ्या हृदयानं ठाव सोडला.

सारेच मोठमोठ्यानं हंसत होते, खिदळत होते, बोलतां बोलतां

एकमेकांच्या हातावर टाळ्या देत होते. आणि तीही त्यांच्याशीं मिळून मिसळून वागत होती.

तो प्रकार पाहून मला जरा चमत्कारीक वाटलें. त्या सर्वांच्या वर्तनांत माझ्या दृष्टीनें एक प्रकारचा भडकपणा वाटला--थिल्लरपणा वाटला. आतांपर्यंत मला तिचा जो परिचय झाला होता त्या काळांत ती पुष्कळ बोलत असे खरी पण त्यांत थिल्लरपणा नसे. म्हणूनच मला त्या तरुणां-बरोबरचें तिचें वर्तन पाहून तिच्याबद्दलचा आदर थोडासा कमी होईल कीं काय असें वाटूं लागलें.

माझी कुणीच कदर केली नाहीं. मी तिथे होतों कीं नव्हतों हें देखील त्यांच्या हिशोबांत नव्हतें. ते आपापसांत बोलत होते--इंग्रजी भाषेंत बोलत होते; त्यामुळें ते कोण आहेत हेंही मला कळलें नाहीं.

चर्चा राजकारणाची चालली होती. रशियन राजकारण हिंदुस्था-नच्या प्रस्तुत परिस्थितीशीं कसें भिडवतां येईल, याद्दलचें बोलणें चाललें होतें. मला वाटतें, रस्त्यावरून येत असतांनाच सुरू असलेला विषय आंत आल्यावरही त्यांनीं चालू ठेवला होता आणि त्यांतच ती भाग घेत होती. चर्चेचा मागला पुढला भाग काय याची कुणालाच पर्वा नव्हती.

कांहीं वेळानें ती भानावर आली. माझ्याकडे वळून पाहून दचकून मराठींत म्हणाली, "खरंच, मी अगदींच विसरलें. तुमचा परिचय करून द्यायला हवा. हे सुरेंद्र, हे नरेंद्र, हे रमेश—" तिनें जीं नावें सांगितलीं तीं जवळ जवळ सारीं बंगालीच होतीं. त्यामुळें ते कोण आहेत हें अजूनही मला कळलें नाहीं.

माझें नांव सांगतांना मात्र तिला जरा संकोच वाटला. ती म्हणाली, "हे पांडुरंगपंत–पांडोबा म्हणतात यांना—" सारेच खो खो करीत हंसत सुटले.

मला प्रश्न पडला, माझ्या नांवांत हंसण्याजोगें असें काय होतें ?

अजूनही त्यांचें भाषण इंग्रजींतच चाललें होतें. सुरेंद्र म्हणाला "पांडोबा का ? काय करतात हे ? कुठल्या ऑफिसांत कारकून आहेत ?"

या प्रश्नांत खोंच होती ती माझ्या लक्ष्यांत आली. ती काय उत्तर देते तें मी कान टवकारून ऐकत होतों.

ती म्हणाली "नाहीं—हे कारकून नाहींत. माझ्यासारखेच स्वतंत्र आहेत. माझ्यासारखेच स्वतंत्र वृत्तीचेही आहेत—"

एकानें विचारलें "काँग्रेस पक्षाचे तर दिसत नाहींत. नाहींतर खादी असती अंगावर. मवाळांतले आहेत कीं—"

"मी कोणत्याच पक्षाचा नाहीं." मी पुढें सरसावून म्हणालों," मी एक सुखवस्तु गृहस्थ आहे. कांहीं उद्योग करायची मला जरुरी नाहीं. रिकामा वेळ कसा घालवायचा याचा विचार करता वाचनांतच दिवस काढावा असें ठरवून सारा वेळ मी लायब्ररयांतून घालवित असतों. मी नोकर नाहीं राजकारणी नाही—आणि विद्वान तर नाहीच नाहीं. नुसती मॅट्रीक परीक्षा पास झालों आहे कॉलेजची हवा मला एकंदरींत मानवली नाहीं."

माझीं उत्तरें ऐकून ते वरमल्यासारखे दिसले. मी अशीं उत्तरें कां दिलीं याचें माझें मलाच आश्चर्य वाटलें.

प्रत्येकजण प्रत्येकाला डोळा घालीत होता. एकजण तर अगदीं उघड उघड म्हणाला, "मग हे इथं कां? ज्याला कोणता तरी पक्ष नाहीं त्यानं इथं कां यावं? काय नुसत्या कादंबऱ्या वाचायला, कीं आजीबाईच्या गोष्टी सांगायला?"

"शट अप्!" ती म्हणाली "हे माझे स्नेही आहेत."

प्रत्येकजण इंग्रजींतच बोलत होता. मी तेवढा मराठींत उत्तरें देत होतों. त्यांची मातृभाषा काय असावी याची त्यांच्या बाह्य स्वरूपाच्या सारखेपणावरून मला मुळींच कल्पना येत नव्हती.

माझ्या उत्तरानंतर कुणी माझ्या तोंडाला तोंड दिलें नाही. पुन्हा त्यांची चर्चा सुरू झाली आणि पुन्हां ते मला विसरून गेले.

मी नुसता ऐकत बसलों होतों. मला तरी बोलायला कुठें हवें होतें? त्यांच्या भाषणांतील आत्यंतिकता पाहून माझी मोठी करमणूक होत होती. आपण चर्चा केली नाहीं तर जगाचें राजकारण जसें कांहीं थांबूनच राहील, असा अविर्भाव आणून प्रत्येकजण बोलत होता प्रत्येकजणाला वाटत होतें. कीं आपण मोठा मुत्सद्दा आहे. पारिभाषिक वाक्यांची सारखी

सरबत्ती उडत होती. त्यांच्या जोडीनें तीही बोलत असल्याचें पाहून मला तिचें कौतुक वाटत होतें.

ती जसजशी बोलत होती, तगतसा मला पहिल्यानें आलेला राग निवळत चालला होता. साम्यवादाबद्दलची तिच्या तोंडची चर्चा ऐकून मला तिच्या मतांबद्दल अभिमान वाटूं लागला. प्रत्येकाला ती मुद्देसूदपणानें खोडून काढीत होती—वादविवादांत प्रत्येकाला नामोहरम करण्याचा ती प्रयत्न करूं लागली म्हणजे ते इतके चिडून जात. कीं आतां एकादी मारामारी होईल कीं काय असें मला वाटूं लागलें.

चहा आला आणि सगळी चर्चा थंड पडली. केक्स्, टोस्ट भरपूर होते. आधाशासारखा सर्वांनी त्या जिनसांवर ताव मारला. मी नुसताच चहा घेतला.

सर्वजण जायला निघाले तरीही मी उठलों नाहीं. तिनें त्यांना दारापर्यंत पोंचाविलें. जिन्यांवरून उतरत असतांनासुद्धां ते आपापसांत मोठ्या तावातावानें भांडत होते. तो निघणारा आवाज ऐकत मी आपल्याशीच हंसत कोचावर स्वस्थ बसलों होतों.

" कां ? हंसतां कां ? " माझ्या कानीं शब्द आले.

मी हंसून तिच्याकडे पाहिलें. ती म्हणाली "हा माझी एक प्रकारची करमणूक आहे—जिवाचा विरंगुळा आहे. करमणूकही होते आणि थोडें ज्ञानही मिळतें आणि त्याच्याबरोबर ज्या विषयाचा मी अभ्यास करीत आहें, तो विषय मला कितपत कळला आहे याचा अंदाज करतां येतो—"

ती सारखी बोलत होती—मी ऐकत होतों आणि त्यांतला आवश्यक तेवढा सारांश घेत होतों. मी जायला निघालों त्यावेळीं तिनें ड्रायव्हरला बोलावून घेतलें.

एकूण हिचा ड्रायव्हर होता तर. मग ही स्वतःच गाडी कां चालवते ? मी विचारलें तेव्हां ती म्हणाली " परावलंबी जिणं मला आवडत नाहीं. एका मोटारीबरोबर एका ड्रायव्हरचा खर्च कांहीं भारी नाहीं. अडीअडचणीच्यावेळीं—प्रकृति बिघडली तर हाताशीं असावा म्हणून ड्रायव्हर ठेवला आहे येवढंच. "

निरोप देतांना तिनें माझ्या हातांत हात घालून मग नमस्कार केला. प्रश्नचिन्हांनीं माझ्या अंतःकरणांत थैमान करून सोडलें.

# ३

माझ्या वृत्तींत कांहींतरी फरक होतो आहे असा मला संशय येऊं लागला. स्वतःच्या खाण्यापिण्यापलीकडे मी कधीं कुणाचीच कदर केली नव्हती. शेजारीपाजारी लोकांपासून देखील मी फटकून राहात होतों. कुणाच्या सुखदुःखाबद्दल मी कधींच सहानुभूति दाखवित नाहीं याचें शेजाऱ्यांना केव्हां केव्हां आश्चर्य वाटे.

मी कुणाची सहानुभूति धरली नाहीं आणि कुणाच्या सहानुभूतीची मी अपेक्षाही केली नाहीं, त्या माझ्या एकलकोंड्या अंतःकरणांत नवें बीं रुजूं लागलें होतें. नंदिनीबद्दल मला काळजी वाटूं लागली होती.

तिच्या आजूबाजूला जो घोळका जमत असे तो केवळ चैनचाल करण्याकरितांच गोळा होई असें मला स्पष्ट दिसून येत होतें. बहुतेकांना कांहीं उद्योगधंदा नव्हता. निरनिराळ्या वर्तमानपत्रांच्या ऑफिसांत बसून गप्पा मारीत वेळ घालवणारें हें टोळकें नंदिनीच्या चांगुलपणाचा गैरफायदा घेत आहे असें जरी मला दिसून येत होते, नंदिनीला तें दाखवून द्यावें असेंही जरी मला वाटत होतें, तरीही मी त्या बाबतीत शक्य तेवढी मुग्धता सक्तीनें स्वीकारली होती.

तिची ती मालक होती. चांगली बुद्धिवान होती—तशीच खंबीरही होती. तिच्या चांगुलपणाचा हे लोक जो फायदा घेत होते याची तिला जाणीव नव्हती असें नाहीं. मग मला वाटलें, मी कशाला या प्रकरणांत तोंड घालावं ?

तरीही माझा जीव तळमळत होता. माझा उभा जन्म एकलकोंडेपणांत

गेलेला. वडील हयात होते त्यावेळी त्यांनींही कधीं मला मोठ्या वात्सल्यानें वागवलें नव्हतें. आपली काळजी आपणच वाहायची. आपलीकडे सहानुभूतीच्या भावनेचा माझ्या हृदयांत यापूर्वी प्रादुर्भाव झाला नव्हता. पण आतां ही नसती विवंचना मागे लागली. स्वतःचा विचार करण्याऐवजीं नंदिनीच्या भवितव्याचा मी अंदाज घेऊं लागलों! काय माझा संबंध होता? लोकल ट्रेनमधून प्रवास करतांना रोज एकमेकांना भेटणारीं माणसें जितका जिव्हाळा बाळगतात तितकाच जिव्हाळा मला नंदिनीविषयीं वाटला पाहिजे होता.

परंतु तसें झालें नाहीं. जुन्या मित्रांपेक्षां ती मला निराळ्या तऱ्हेनें वागवित होती असें मला स्पष्ट दिसून येत होतें. हा प्रपंच कां? जुन्या मित्रांचीं गाऱ्हाणीं नुकताच परिचय झालेल्या माझ्यापुढें तिनें कां मांडावीत? आत्मपरिक्षण करण्यासाठीं का?

कारण एवढेंच नव्हतें. मला स्वतःलासुद्धां तिच्याबद्दल जिव्हाळा वाटूं लागला होता. स्नेहभावाचा उद्रेक माझ्या हृदयांत पहिल्यानेंच झाला होता. मन मोकळें करून कुणीच माझ्याशीं कधीं बोललें नव्हतें. ती बोलूं लागली. पहिल्यानें मुकाटनें मी तिचें बोलणें ऐकत गेलों. पुढें पुढें आपण होऊन चौकशी करावी असें मला वाटूं लागलें.

मला प्रश्न पडे तो हाच, कीं हें कशाचें लक्षण? अंतःकरणांत कुठें तरी नाजुक भावना तर निर्माण झाली नाहीं?

मी पुष्कळ कादंबऱ्या वाचल्या होत्या—मराठी आणि इंग्रजी—प्रत्येकींत पहावें तर एकच गोष्ट—प्रेम! या प्रेमावर माझा विश्वास नव्हता. जरी मी जगाशीं मिसळत नव्हतों तरी द्रष्टा या नात्यानें आजूबाजूला पहात असतां प्रपंचातलीं निरनिराळीं जोडपीं माझ्या नजेरला येत होतीं. त्यांच्या चरित्रांचें मी सूक्ष्म अवलोकन केलें होतें. आमच्या या खऱ्या संसारांत कादंबरीतलें प्रेम मला कुठेंच दिसून येत नव्हतें. नव्या पीढीतील कांहीं जोडपीं पहिल्या पहिल्यानें भावनेचे सुस्कारे टाकीत कबुतरासारखीं कुहू कुहू करीत असलेलीं माझ्या नजेरला येतात न येतात तोंच संसार थाटतांच त्यांच्या कौटुंबिकतेचा शिमगा झालेला मी प्रत्यहीं पहात होतों. सुखी जोडपीं नव्हतीं असें नाहीं. पण तें

कौटुंबिक सौख्य म्हणजे ग्रंथांतून वर्णिलेलें प्रेम नव्हतें.

अशा रीतीनें जगाकडे पाहायची संवय लागल्यामुळें असली एखादी नाजुक भावना माझ्या हृदयांत जागी होईल असें मला केव्हांच वाटलें नाहीं. तरीही नंदिनीविषयीं मला सहानुभूति वाटत होती.—कळकळ वाटत होती—जिव्हाळा वाटत होता. एकाद्या दिवशीं तिची भेट झाली नाहीं तर मनाला हुरहूर लागे. तिच्या घरीं जाऊन चौकशी करावी असे देखील मनांत येई. तसा कधीं मी गेलों नाहीं खरा, पण दुसऱ्या दिवशीं भेटतांच आदल्या दिवशीची आतुरता माझ्या भाषणांतून निसटून गेल्याचें माझ्या ध्यानांत आल्यावांचून राहात नसे.

अशावेळीं तीसुद्धां मोठी काकुळतीला येई.

एके दिवशीं ती म्हणाली, "तुम्ही आता फोन घ्या. मधेंच कांहीं-तरी कारणानं मला भेटतां येत नाहीं. फोन असला कीं चटकन सांगतां येईल."

"एवढं कशाला जेव्हांच्या तेव्हां कळवायला हवं?" असें मी म्हटलें खरें पण दुसऱ्याच दिवशीं अर्ज करून फोन घेतला.

माझें मलाच आश्चर्य वाटलें. मी कुठें तरी वाहावत होतों. अंतरींतली खूणगांठ निसटत होती. मनावरचा काबू सुटत होता. करूं नये असें वाटत असतांही सहजगत्या त्या त्या गोष्टी करून जात होतों. मला वाटलें, नंदिनीनें माझ्यावर छाप टाकली.

सावध राहण्याचा प्रयत्न जरी सारखा चालला होता तरी माझें मलाच कळत होतें, कीं मी अगतिक होत चाललों होतों. नंदिनीवांचून मला चैन पडेनासें झालें होतें. कोणत्याही प्रकारची कामुक भावना माझ्या हृदयांत केव्हांच उद्भवली नाहीं. पण स्नेहाचे धागेदोरे मला तिच्याशीं जखडून बांधून टाकूं लागले होते.

तीही तशीच अगतिक झाली होती का? उठल्यासुटल्या ती मला कां फोन करीत होती? मी आतांच जेवून उठलें, अमुक पुस्तक वाचलें आहे, अमुक पुस्तकांत अमुक विषय आला आहे त्याबद्दल तुम्हाला काय वाटतें? म्हणून दहा दहा, पंधरा पंधरा मिनिटें ती फोनवर कां बोलत बसत असे?

फोनमुळें आम्ही एका जागीं राहण्याचें सौख्य अनुभवित होतों. बंगल्यावरून निघतांना तिनें फोन करावा, कपडे करून मी खालीं येऊन उभें राहावें आणि 'कार' येतांच तिच्या शेजारीं बसून निघावें असें चाललें होतें. शेजारची पोरेंच नव्हेत तर मोठीं माणसेंसुद्धां थट्टा करूं लागलीं होतीं.

मला वाटे, जे विचार माझ्या मनांत येतात ते विचार तिला कळत असतील का? ती सारखी बडबडत असे, मी सारखा ऐकत राहीं. पण मी मध्यें बोलत नाहीं— विरोध करीत नाहीं म्हणून तिनें कधींच तक्रार केली नाहीं.

एके दिवशीं ती म्हणाली, "असल्या गलिच्छ वस्तीत कां राहतां तुम्ही? ही जागा भाड्यानें देऊन चौपाटीकडे किंवा गांवदेवीला एखादा चांगलासा ब्लॉक घेऊन कां राहात नाहीं?"

"हें माझं घर आहे." मी म्हणालों, 'माझं घर दुसऱ्याला भाड्यानं द्यायचं आणि दुसऱ्याच्या घरांत आपण भाडेकरू म्हणून राह्यचं, असलं भाडोत्री जीवन मी कां पत्करावं? जागा गलिच्छ असेल पण ती माझी आहे. ही जागा विकून टाकून दुसरी घेण्याचें सामर्थ्य मला नाहीं. तसं करायला गेलों तर माझी असलेली पुंजी नाहीशी होईल. मला नोकरी करायची नाहीं. उद्योगधंद्यांत पडायची माझी इच्छा नाहीं. चळवळींची मला हौस नाहीं. मग असेना कां गलिच्छ वस्ती? उभा जन्म मी इथं घालवला पण माझ्या प्रकृतीवर कधीं कांहीं परिणाम झाला नाहीं. शेजाऱ्यापाजाऱ्यांचा मला उपसर्ग होत नाहीं. एकांताची मला आवड आहे, तो एकांत मला इथं भरपूर मिळतो. भरपूर वाचायला मिळतं. ट्रामगाड्यांची कांहीं गडबड नाहीं. या गलिच्छ वस्तींतच कां होईना पण मलबार हिलचीं सारीं सौख्य मला इथं मिळतात. मग ही जागा मी कां बदलूं?"

"खरं आहे तें!" ती गंभीरपणें म्हणाली, "आपल्या जागेचा, आपल्या वास्तूचा जिव्हाळा मोठा विलक्षण असतो. एकलकोंडेपणा मलाही आवडत नाहीं. पण मलबार हिलवरचं हे जिणं म्हणजे तुरुंगाची हवा वाटते. चांगल्या गजबजलेल्या जागीं राहावं असं वाटतं मला पण स्वतःच्या

घराचा मोह सोडवत नाहीं. वाईट वाटतं तें इथं येतांना. तसा विपर्यास करून घेऊं नका —पण या तुमच्या गल्लींत यायचं माझ्या मोठं जिवावर येतं—"

"आणि म्हणूनच मी ही गल्ली सोडणार नाहीं." मी हंसत म्हणालों, "या गल्लीचा परिचय एरवीं तुम्हांला कसा व्हावा? गरिबागुरिबांच्या गोष्टी तुम्ही बोलतां पण अशा जागीं आल्याशिवाय गरिबांच्या गरिबीची जाणीव काळजाचा चिमटा घेणार नाहीं. ही वस्ती तुम्हांला गलिच्छ वाटते. पण या मुंबईत अशीं कांहीं स्थळं आहेत, कीं त्यांच्याशीं तुलना केली तर ही भानगड गल्ली म्हणजे मलबार हिल ठरेल—"

बोलत असतांना मी मधेंच थांबलों. नंदिनी अगदीं गंभीर झाली होती. तिच्या चेहऱ्यावरची खेळकर मुद्रा पार मावळून गेली होती—डोळे तारवटले होते.

आम्ही अपोलो बंदरच्या गेटवेकडे येऊन पोंचलों म्हणून बरें झालें. नाहींतर मला वाटतें त्यावेळीं गर्दीच्या रस्त्यांत असतों तर अन्य-मनस्कपणामुळें तिच्या हातून एकादा अपघातही झाला असता.

गाडी थांबली खरी पण आम्हीं दोघे गाडीखालीं उतरलों नाहीं—उतरण्याची गोष्टही कुणी काढली नाहीं.

मी विचारलें, "कधीं पाहिली आहे का ती वस्ती तुम्ही?" तिनें नुसत्या मानेनें नकार दिला.

मी म्हटलें, "समाजवादाचा नुसता पुस्तकी अभ्यास करून भागत नाहीं. ती वस्ती एकदां पाहिली पाहिजे. तात्विक ज्ञान सोपं आहे. परिभाषेची बडबड तर त्याहूनही सोपी आहे. पण कोणत्या परिस्थि-तींतून हें तत्वज्ञान जन्माला आलें ती परिस्थिति आधीं पाहिली पाहिजे—समजावून घेतली पाहिजे—"

"खरं आहे-खरं आहे!" ती उतावीळपणानें माझें वाक्य संपू न देतां म्हणाली, "पाहीन—अवश्य पाहीन—"

"पाहून भागणार नाहीं" मी जरा कठोरपणानें बोललों, "नुसतं पाहून काय होणार? त्यांत मिसळलं पाहिजे—एक झालं पाहिजे. ती सहानुभूति अस्सल पाहिजे—नक्कल नको."

ती स्तब्ध राहिली मिनिटांवर मिनिटें गेलीं पण ती कांहींच बोलत नाहीं असें पाहून मीही माझें भाषण चालू ठेवण्याचा उपक्रम केला नाहीं.

तिच्या मनावर परिणाम झाला होता. ती विचार करीत होती. त्या विचारांची सांखळी तोडावी असें मला वाटेना. कांहींच न बोलतां अशीं पंधरा वीस मिनिटें निघून गेलीं.

चटकन् माझ्याकडे वळून भेदकपणें पाहात ती म्हणाली, " तुम्ही काय काय वाचलं आहे—या समाजवादाबद्दल ?"

" मिळणारीं सारीं पुस्तकं मी वाचलीं आहेत. पण चर्चात्मक पुस्तकांपेक्षां या चळवळीच्या इतिहासावर ज्या कादंबऱ्या लिहिल्या गेल्या आहेत त्या मला जास्त आवडल्या. त्या कादंबऱ्यांत समाजाच्या सर्व अंगांचा पुरेपुर विचार केलेला आढळतो. त्या त्या काळांतल्या त्या त्या चळवळींत भाग घेणाऱ्या असामान्य व्यक्तींपेक्षा सामान्य व्यक्तींच्या मनोभूमीचें चित्र कादंबऱ्यांत सांपडतें, म्हणूनच मला त्या जास्त आवडतात. असामान्य व्यक्तींच्या मनोभूमीशीं मला समरस होतां येत नाहीं. सामान्य व्यक्तींच्या ठायीं मला आपुलकी वाटते. मीदेखील एक सामान्य माणूस आहें; जिथं क्रांति झाली आहे तिथलीं सामान्य माणसं कशीं असतात हें म्हणूनच कळावं असं मला वाटतं. मार्क्सचें ' कॅपिटल ' मी वाचलं पण तें मला चांगलसं कळलं नाहीं असं म्हणायला मला मुळींच लाज वाटत नाहीं. त्यापेक्षां ' सीमेंट ' ही कादंबरी मला जास्त आवडली—तुम्ही वाचली आहे का ती ?"

पुन: तिनें मानेनेंच नकार दिला.

" तर मग माझं ऐका. एकदां या साऱ्या रशियन कादंबऱ्या वाचा—क्रांतिनंतरच्या ! पूर्वीच्या वाचायच्या असल्या तर त्या मागाहून वाचतां येतील—"

पुन: स्तब्धता पसरली. आजूबाजूला सारी गडबड सुरू होती. फेरीवाले ओरडत होते पारशी जोडपीं हातांत हात घालून जात होतीं. कुणी होड्यांतून आणि लाँचमधून सहल करण्यासाठीं निघत होतीं. निमगोऱ्या मुली तोंडाला बरीचशी पावडर माखून गोऱ्या तरुणांच्या नजरेंत भरण्यासाठीं उगीच इकडे तिकडे येरझाऱ्या घालीत होत्या. पण या

सर्व गडबडीकडे तिचें लक्ष नव्हतें.

तिची ती मनःस्थिति पाहून मला समाधान वाटलें.

अशींच आणखी कांहीं मिनिटें गेलीं. तिनें गाडी चालू केली. आणि आम्ही भानगड गल्लींत येऊन पोहोंचलों.

मी गाडीखालीं उतरलें—तीही दुसऱ्या बाजूनें उतरली. यापूर्वीं ती कधींच अशी उतरली नव्हती. कांहींच न बोलतां—किंवा तिला न बोलावतां मी जेव्हां माझ्या घरीं जाऊं लागलों तेव्हां तीही माझ्या मागोमाग येऊं लागली. आजूबाजूच्या खिडक्या दरवाजांतून वृद्ध, तरुण, स्त्रिया, मुलें डोकावून पाहूं लागलीं.

मी वर आलों. दरवाजाची कडी काढली. स्विच दिला. दिवा लागला.

डोकीवरची टोपी काढून नित्याप्रमाणें फेंकून दिली, कोटही तसाच एका खुर्चीवर टाकला आणि मागें वळून पाहिलें तो नंदिनी तिथें उभी होती.

तिची मुद्रा पालटली होती. पूर्वीप्रमाणें ती गंभीर झाली नव्हती खरी पण नित्याची खेळकर वृत्तीही तिच्या मुद्रेवर दिसत नव्हती.

"या, बसा ना!" मी म्हटलें.

माझ्या खोलींतल्या खुर्च्या अगदीं साधारण प्रतीच्या होत्या—जुन्या पुराण्या होत्या. टेबलावर पुस्तकांची रास पडली होती. कपडेही इकडे तिकडे अस्ताव्यस्त पडले होते

तिनें चोंहिकडे नजर फेंकली आणि अगदीं अदबीनें म्हटलें, "या अशा अव्यस्थितपणांत राहणं तुम्हांला आवडतं?"

"हें पुरुषी घर आहे आमचं!" मी हंसत हंसत म्हटलें, "कोण इथं व्यवस्था ठेवणार? गडी आहे. तो आपल्या परीनं नीटनेटकेपणा आणण्याचा प्रयत्न करतो पण माझ्या गबाळेपणापुढें त्याला हार खावी लागते—" माझ्या वडिलांच्या हयाती पासूनची हकिकत सांगण्यास मी सुरवात केली आणि त्याबरोबरच तिनेंही खोलींतला अव्यवस्थितपणा नाहींसा करण्याचा उपक्रम केला. टेबलावरचीं पुस्तकें तिनें नीट लावून ठेवलीं, अस्ताव्यस्त पडलेले कपडे खुंटीवर ठेवून दिले. माझ्या भाषणाला

ती मधून मधून हूंकार देत होती.—केरसुणी घेऊन ज्यावेळीं ती खोली झाडूं लागली त्यावेळीं मात्र माझ्यानें राहवेना.

"तुम्ही कशाला झाडतां?" मी म्हटलें, "गाडी येईल कीं आतांच!"

तिचें झाडणें सुरू होतें. झाडीत झाडीत ती म्हणाली, "अव्यवस्थितपणा मला आवडत नाहीं. मला इथं घटकाभर बसायचं आहे—तुमच्यासाठीं नव्हे, माझ्या समाधानासाठीं म्हणून मी खोली झाडतें आहें."

माझें बोलणें थांबलें पण तिचें काम मात्र सुरू होतें. तिच्या प्रत्येक हालचालीकडे मी लक्षपूर्वक पाहात होतों. तींत मोठा रेखीवपणा होता. प्रत्येक गोष्ट ती अगदीं नीटनेटकेपणानें करीत होती.

माझ्या डोळ्यांसमोर एक क्षणभरच चक्कर आल्यासारखें झालें. त्या चित्रानें माझ्या हृदयावर आघात केला. कौटुंबिकतेची कल्पना माझ्या हृदयांत आली होती. घरच्या मालकासारखा मी उभा राहून निरीक्षण करीत होतों आणि ती—कुणासारखी बरं?—मोलकरणीसारखी तर खास नव्हे—घरच्या गृहिणीसारखी माझ्या अव्यवस्थित संसाराला शोभा आणण्याचा प्रयत्न करीत होती.

त्या चित्रामागें दिसणाऱ्या या भावनात्मक कल्पनेमुळें माझें हृदय थरारून गेलें. माझ्या सर्वांगाला कंप सुटला. पूर्वी माझ्या अंतःकरणांत कधींही न जागृत्या झालेल्या वृत्ति मला डिंवचूं लागल्या.

सारी साफसूफ झाल्यानंतर तिनें चोहींकडे नजर फेंकली—तिरपी मान करून तिनें माझ्याकडे पाहिलें आणि अगदीं नाजुकपणें म्हटलें, "आतां अगदीं छान दिसतं नाहीं?"

मी नुसता हंसलों तेव्हां ती पुढें म्हणाली, "या बसा आतां. आतां आपण जरा गप्पा मारूं."

पूर्वीचा सारा गंभीरपणा नाहींसा झाला. कोणताच तात्त्विक प्रश्न निघाला नाहीं. खरोखरच आम्ही गप्पा मारीत बसलों.

बराच वेळ गेल्यानंतर तिनें मनगटांतील घड्याळाकडे पाहिलें आणि म्हटलें, "फार वेळ झाला नाहीं? उशिर झाला म्हणून रागावणारं मला घरीं कुणी नाहीं खरं पण नोकर माणसांनादेखील किती वाट पाहा-

यला लावायची ? जाऊं आतां ?"

ती जायला निघाली—दाराजवळ थांबून वळून म्हणाली, " आतां ही व्यवस्था यापुढं अशीच राहिली पाहिजे. कांहीं बिघाड होतां नये. इथं अशीच केव्हांतरी Surprise visit देईन आणि पुनः गबाळेपणा दिसला---गबाळेपणा दिसला तर माझ्याशीं गांठ आहे म्हणावं !"

ती झटकन् निघून गेली. मी तसाच बसून राहिलों.

कुठली कोण ही—माझ्या घरांत येऊन माझ्यावरच सत्ता गाजवते म्हणजे काय ? कोणत्या अधिकाराच्या जोरावर ?

मनांतून चिरड येत होती तरी मी आपल्याशींच हंसूं लागलों.

---

# ४

तितक्यांत एक वावटळ आली. समाजवादी लोकांची पकडापकड होऊन मीरतचा खटला सुरू झाला.

नंदिनीच्या घरीं येणारीं जी तरुण मंडळी होती त्यापैकीं कुणीही या खटल्यांत पकडला गेला नव्हता. पण मीरतच्या खटल्यांत समाविष्ट झालेल्या एकाद्या पुढाऱ्याचे ते तरुण अनुयायी होते.

म्हणूनच केव्हांही नंदिनीकडे जावें तेव्हां मीरतच्या खटल्याखेरीज दुसरी कसलीही चर्चा ऐकूं येईनाशी झाली होती. त्याच त्याच विषयाचें पुन:पुन: चर्वितचर्वण केलेलें मला आवडत नसे. पहिल्या पहिल्यानें जरी मधून मधून या चर्चेत मी भाग घेत असें तरी पुढे पुढें मी त्यांतून अलग राहूं लागलों.

हा खटला कितीतरी दिवस चालला होता. कितीतरी साक्षी पुरावे होत होते. खटला चालू असतां आणखी कांही कांहीं व्यक्ती पकडून नेऊन खटल्यांत समाविष्ट केल्या जात होत्या. त्यामुळें मागें राहिलेल्या या अनुयायी मंडळीची मनःस्थिती सदोदीत असमाधानाची असे.

नव्या नव्या चळवळी सुरू होत होत्या. राजकारणांत जिकडे तिकडे खळबळ चालली होती. साबरमतीच्या सत्याग्रहाश्रमांतून देखील कांहीं-तरी कुलंगडीं उपस्थित होतील असें सर्वत्र वाटत होतें.

समाजवादी आणि सत्याग्रही व्यक्तीचें केव्हांच जमत नव्हतें. अनत्याचारी चळवळीवर समाजवादी लोकांचा मुळींच विश्वास नव्हता. म्हणजे

अत्याचाराकडे त्यांची प्रवृत्ति होती असें नाहीं. पण अप्रतिकारात्मक चळवळ समाजवाद्यांना पसंत नव्हती.

याच विषयाची सदोदित चर्चा सुरू असे. सनातनी लोकांच्या तोंडचे वेद, उपनिषदें आणि पुराणांचे आधार पुराणवादित्वाच्या समर्थनासाठीं जितक्या आवेशानें निघत असत. तितक्याच आवेशानें मार्क्स, एंजल्स आणि लेनीन यांचे आधार देऊन समाजवादी भांडत होते.

दोघांचीही मतें मला पसंत नव्हती. दोघांचाही आवेश मला संमत नव्हता. या आवेशाच्या मुळाशीं खोल विचारांचा अभाव आहे, असेंच मला वाटे. बदलत्या परिस्थितीला वेदा-पुराणांचे आधार जितके अप्रस्तुत होते तितकेंच स्वतंत्र राष्ट्राच्या सार्वत्रिक स्वातंत्र्यासाठीं मार्क्स, लेनिन प्रभृतींनीं काढलेली प्रमेयें हिंदुस्थानासारख्या गुलाम–राष्ट्राला सर्वस्वानें लागू पडणारीं नाहींत असें मला वाटे.

माझीं हीं मतें कुणालाच पटत नसत. नंदिनीचें मन दुश्चित्त होतें. केव्हां केव्हां तिला गांधींचीं मते पटत. तर केव्हां केव्हां ती मार्क्सवादाकडे झुके. सुरेंद्र नांवाचा जो तरूण समाजवादी होता तो मात्र बराच विचारी असावा असें मला वाटे. त्याला गांधी आणि मार्क्स या दोघांचीहीं मतें पटत होतीं. पण हिंदुस्थानच्या राजकारणासाठीं या दोन्ही प्रमेयाचा समन्वय कसा करायचा हें त्याला चांगलेसें ठरवतां येत नव्हतें.

सुरेंद्र म्हणे, " या दोन्ही तत्वांचा समन्वय झाला पाहिजे यांत शंका नाहीं. खरा मानवसमाज समतेच्या पातळीवर आणण्यासाठीं अत्याचाराची जरूरीच आहे असें मला वाटत नाहीं. पण चातुर्वर्ण्याच्या जुन्या कल्पना, ईश्वरावरचा निरुपमेय निर्भर वगैरे गांधींची तत्वें मला बिलकूल पटत नाहींत. निःशस्त्र झालेल्या राष्ट्राला लढाई करायला अनत्याचारासारखं—अप्रतिकारासारखं दुसरं शस्त्र नाहीं, असें गांधीप्रमाणें मला वाटतं. या शस्त्रांचा सार्वत्रिक उपयोग अजून झाला नाहीं आणि तो करून घेण्यांची पात्रता आम्हा लोकांत आहे असंही मला वाटत नाहीं. त्याचप्रमाणें मार्क्सचे नियम हिंदुस्थानसारख्या गुलाम राष्ट्राला लावतांना जड जाईल असेंही मला वाटतं. दोन्हा तत्वांतल्या या अडचणी सारख्या आहेत. यांतून मार्ग कसा काढायचा ?"

सुरेंद्राचें म्हणणें मला पटे. पण त्यामुळें बाकीचे सारे तरुण आम्हां दोघांची टर उडवित असत. नंदिनी त्यांत सामील होत नसे खरी, परंतु त्या त्यांच्या वर्तनाचा ती प्रतिकारही करीत नसे.

मधें काय झालें कुणाला ठाऊक, सुरेंद्र नंदिनीकडे येईनासा झाला. तो कां येत नाहीं हें मला कळलें नाहीं. तो येत नाहीं याची कुणी विचारणाही केली नाहीं.—किंवा तो पुन्हां यावा म्हणून कुणी खटपटही केली नाहीं, इतकेंच नव्हे तर तो पूर्वी येत होता याची जाणीवही कुणी दाखवीत असल्याचें दिसून आलें नाहीं.

सुरेंद्राचा आधार सुटल्यामुळें मी चर्चेत भाग घेईनासा झालो. नंदिनीनेंही मला मुद्दाम होऊन चर्चेत कांहीं ओढलें नाहीं. तरुण आपल्याच रगांत दंग असत, त्यांना माझी मुळींच खिजगणती नव्हती.

नंदिनीच्या दहशतीमुळें मी माझ्या खोलींतली व्यवस्था नीटनेटकी ठेवण्याचा कसोशीनें प्रयत्न करीत होतों. खरोखरच तिनें आपलें वचन पाळलें होतें. चार दोन दिवसांनीं माझ्या खोलींत येऊन ती व्यवस्थित आहे कीं नाहीं हें पहाण्याची ती खबरदारी घेई. अव्यवस्था झालेली दिसल्यास ती स्वतः दुरुस्त करी.

मला एक प्रकारची शिस्त लागली.—माझ्या गड्यालाही शिस्त लागली.

पुनः पुन्हां मला वाटे, नंदिनीची दहशत मी कां वढी कां बाळगावी ? मी कांहीं तिचा नोकर नव्हतों. तिनें माझ्यावर जरब चालवावी असें कोणतेंच कारण अस्तित्वांत आलें नव्हतें.

केव्हां केव्हां मला वाटे, मुद्दाम होऊन अव्यवस्था करावी आणि नंदिनीला दाखवून द्यावें, कीं तिची कदर आपण बाळगीत नाहीं.

पण मनांत आणलेला हा विचार मी केव्हांच अमलांत आणला नाहीं. तिनें माझ्यावर छाप टाकली होती यांत शंका नाहीं.

आम्ही जवळ जवळ समवयस्क होतों—दोघांच्या वयांत एकाद्या वर्षाचा फरक असेल नसेल. त्या समवयस्कतेचाच हा परिणाम होता का ?

कीं दुसरें कांहीं कारण होतें ? संसारांत पडण्याची कल्पना माझ्या मनांत कधींच आली नव्हती—आजही येत नव्हती. बंधनाचा मला

तिटकारा होता. आधीं बंधन घालून घ्यायचे आणि मग तें तोडण्याचा प्रयत्न करायचा असला तेढा उपद्व्याप करण्यापेक्षां मुळीं बंधनांतच पडूं नये हें काय वाईट ?

संसार थाटण्याची कल्पना म्हणूनच मला आकर्षक होत नव्हती. संसारी माणसात मी मिसळलों नव्हतों. दुरून त्यांचीं सुखदुःखें पाहत होतों. पण तो दूरस्थपणा देखील फार लांबच्या अंतराचा होता. संसारी माणसाची गृहस्थितीसुद्धां माझ्या परिचयाची नव्हती.

संसार थाटण्याच्या मुळाशी कोणत्या कल्पना आहेत याचा मला अंदाज नव्हता

प्रथम प्रेमांत पडावें, नंतर लग्न करून संसार थाटावा, मुलेंबाळें व्हावीत, त्या मुलाबाळांच्या वात्सल्यानें प्रपंचाचा पसारा वाढवावा, हीच काय ती संसाराची कल्पना. या कल्पनेला सुरवात होते आहे प्रेमापासून. सक्तीनें केलेल्या लग्नाचे परिणाम काय होतात याचीं वर्णनें मी पुस्तकांतून वाचली होतीं, तशींच प्रेमाच्या आधारावर उभारलेल्या संसाराचीं गोड दृश्येंही मला वाङ्मयाच्याद्वारें परिचित झालीं होतीं. प्रत्यक्ष मी कांहींच पाहिलें नव्हतें.

म्हणूनच मला संसाराची भिती वाटे. आपला एकटा आहे तो बरा आहे.–कशाला उगीच व्याप वाढवावा—व्यापाच्या पाठीं संताप होणारच–अशी माझी विचारसरणी होती.

आज मी माझ्या खोलीकडे नजर टाकली, कीं मला वाटे कीं माझ्या विचारसरणीला कुठें ना कुठें धोका आला. खोलीकडे पाहिलें कीं थाटलेल्या संसाराचा भास होई. गृहिणी घरात नव्हती खरी पण नंदिनीनें लावलेली जरब घरच्या गृहिणीपेक्षांही कडक होती

हा विचार आला कीं माझें मन कावरेंबावरें होऊन जाई. आजपर्यंत मनाला घातलेला लगाम कुठें तरी तुटूं लागतो आहे कीं काय असें वाटे. नंदिनीकडे पहाण्याची आजपर्यंतची दृष्टि बदलते आहे—कुठेंतरी नवा धागादोरा जडतो आहे—कसलें तरी अज्ञात आकर्षण मला नंदिनीकडे खेंचतें आहे, असा भास होई.

तो भास होता कीं सत्य होतें ? यापूर्वीच्या माझ्या मित्रहीन जीव-

नांत एक नवा मित्र मिळाला. योगायोगानें ती स्त्री निघाली! एक तरुणी! हाच एकादा पुरुष असता तर त्यानेंदेखील माझ्या मनावर असाच परिणाम केला असता का? त्यानें देखील अशीच जरब लावली असती का? त्याचें देखील असेंच आकर्षण वाटलें असतें का?

त्या प्रश्नाचें उत्तर मला देतां येईना. कोणत्याही पुरुषाशीं माझा स्नेहसंबंध जुळून आला नव्हता. मताच्या सारखेपणामुळें सुरेंद्राबद्दल मला ओढा वाटे. पण इतके दिवस त्याची भेट झाली नाहीं तरी मुद्दाम होऊन त्याचा तपास करावा, त्याला गांठावें, असें मला केव्हांच वाटलें नाहीं.

नंदिनीनें माझ्या मनावर कांहींतरी परिणाम केला होता यांत शंका नाहीं. एक दिवस ती दिसली नाहीं तर माझा जीव व्याकुळ होई. एकादे दिवशीं ती आजारी पडली तर तिच्या घरीं जाऊन घटकान् घटका एक शब्दसुद्धां न बोलतां मी तिच्या बिछान्याजवळ बसून राहीं.

शारीरीक आकर्षणाचा माझ्या मनावर कधींच परिणाम झाला नव्हता—म्हणजे मी परिणाम होऊं दिला नव्हता. बाह्यसौंदर्याबद्दल मला एक प्रकारचा तिटकारा होता—निदान औदासिन्य तरीं खात्रीनें होतें. नंदिनी देखणी होती, सशक्त होती, सुदृढ होती, पोषाख करण्यांत नीटनेटकी होती. पण त्या देखणपणाचें किंवा नीटनेटकपणाचें आकर्षण मला असह्य झालें नव्हतें. तारुण्यसुलभ दृष्टीनें मी कदाचित् तिच्याकडे पाहिलें असेल. पण त्या पलीकडे माझ्या भावना कधींच गेल्या नाहींत.

मग हें काय झालें होतें? कुणाला विचारीन म्हटलें तर जिव्हाळ्याचें असें कुणीच नव्हतें. नंदिनीला तर विचारणें अशक्यच होतें. ती होऊन कांहींतरीं बोलेल म्हणून मी वाट पहात होतों. माझे विचार मला दाबून ठेवतां येत असत. पण विचाराचें अतिक्रमण तिला आवरतां येत नसे हें मला माहीत होतें. तसें अतिक्रमण होतांच ती विचारल्याशिवाय राहाणार नाहीं. अशी माझी जी खात्री होती ती एके दिवशीं खरी ठरली.

एके दिवशीं मी तिच्या बंगल्यावर गेलों होतों. चालू राजकारणाच्या गोष्टी बोलत बसलों होतों. तिथें दुसरें कुणी नव्हतें किंवा येण्याचा संभवही नव्हता.

मध्येंच बोलणें थांबलें, आणि कोचावर मागें मान टाकून कांहीं

वेळ नंदिनी अगदीं स्वस्थ पडली. ती कांहीच बोलत नाहीं असें पाहून, बरांच वेळ वाट पाहून, ज्यावेळीं मी तिला विचारलें तेव्हां ती म्हणाली, " एकलकोंडेपणाचा मला अगदीं वीट आला आहे !"

" एकलकोंडेपणाचा ?" मी विचारलें, " एवढी मित्रमंडळी इथें गोळा होते, दररोज आपण बोलतों, बसतों, चर्चा करतों—"

" तरीही अगदी एकटं एकटंच वाटतं मला !" नंदिनी एक सुस्कारा सोडून म्हणाली, ' घरांत कुणी नात्याचं असतं—कुणी जिव्हाळ्याचं माणूस असतं— फारसा जिव्हाळा न दाखविणारे माझे बाबा जरी हयात असते तरीही मला असं एकलकोंडं वाटल नसतं. हे सारे स्नेहसंबंध कसे बाजारी वाटतात ! असं वाटतं, उद्यां माझी मतं बदललीं तर इथं कुणी येतील का ? असेच बोलत बसतील का ? केव्हां केव्हां असं वाटतं, हे कुणी न येतील तरच बरं. जगाच्या उठाठेवी या किती करायच्या ? स्वतःचं म्हणून माणसाला कांहीं नसतंच का ? जो उठतो तो जगाच्याच गोष्टी बोलतो, जगाची उलथापालथ करून टाकण्याच्या गोष्टी बोलतो, पण या साऱ्या उलथापालथींत या एकट्या जीवाची जागा कुठं आहे याची चर्चा कुणीच करीत नाहीं—" चटकन् माझ्याकडे रोखून पाहात ती म्हणाली, " तुम्ही सुद्धां या बाबतीत कां कांहीं बोलत नाहीं ?"

" मी सुद्धां ? मी सुद्धां म्हणजे काय ?"

पुन्हां कोचावर मागे मान टाकून ती एक क्षणभर स्वस्थ पडली. ती आपल्याशीच पुटपुटत होती, ' मी सुद्धां म्हणजे काय ?'

माझा जीव अगदीं डोळ्यांत आला होता. ज्या प्रश्नाचें निराकरण नंदिनीकडून होईल अशी मी अपेक्षा करीत होतों तो प्रश्न होऊन गेला होता. आतां मला उत्तर मिळणार होतें. मनाची रुखरुख नाहींशी होणार होती.

पण ' मी सुद्धां म्हणजे काय ?' असें पुनः पुनः पुटपुटत नंदिनी तशीच कोचावर पडून राहिली.

मला वाटलें, नंदिनीची लहर फिरली. उत्तर द्यायला ती कचरते आहे ?—भीते आहे—कीं उत्तर द्यायला नाराज आहे.?

ताड्कन् उठून नंदिनीनें एक खुर्ची ओढून घेऊन तिच्यावर बसत

मला म्हटलें, "मीसुद्धां म्हणजे काय, हा प्रश्न तुम्ही मला घालतां ? हीं एवढीं माणसं इथं येताहेत—तुमचा परिचय व्हायच्या पूर्वीपासून येताहेत—पण त्यांच्याशीं मी कशीं वागतें आहे ? मी कधीं घरीं जातें का त्यांच्या ? केरसुणी घेऊन त्यांची खोली कधीं झाडली होती का मी ? मी लावलेली व्यवस्था त्यांनीं तशीच ठेवली की मोडली, याची कधीं चौकशी करते कां मी ? "

" तें मी कसं सांगूं ?" मी अगदीं संथपणें उद्गारलों.

" खरं आहे तें. तुम्हांला सांगतां यायचं नाहीं. खरंच. मी कुठं जातें किं जात नाहीं हें तुम्हांला तरीं कुठं माहीत असणार ? आपण दोघं कांहीं एका घरांत राहत नाहीं. पण हे इथं येणारे लोक कधीं बोलले का ? कधीं त्यांच्या घरीं आल्यागेल्याचा उल्लेख झाला होता का ? मी कधीं कां आलें नाहीं, म्हणून कुणी विचारलं होतं का ? हल्लीं बहुतेक रोज तुम्ही इथं असतां—रोज आपल्या बैठकी होतात—एवढ्यावरून तरी तुम्हाला कळायला पाहिजे होतं कीं जाणून सवरून तुम्हीं पुरुषी पांघरूण घेत आहांत ?"

" माफ कर नंदिनी " मी ओशाळून म्हणालों, " मी पुरुषी पांघरूण घेतलं नाहीं खरं पण मला निश्चित कांहींच अंदाज नव्हता. माझ्याशीं तुझी वागणूक निराळी असते हे मला कळतं पण तेवढ्यावरूनच अंदाज बांधण्याइतका मी अविचारी नाहीं—"

" अविचारी नाहीं ना ?" नंदिनी चिडून म्हणाली, " मग 'मी सुद्धां' म्हणून कां विचारलंत मला ? असं कांहींतरी तुम्ही म्हटलंत तर मला वाईट वाटेल असं नाहीं का तुम्हांला वाटलं ?"

काय उत्तर द्यावें हें मला सुचेना. ती अगदीं निकाराला आली होती. वेळ मारून नेण्याचा तो प्रसंग नव्हता. मोकळ्या मनानें जें कांहीं बोलायचें तें बोलून टाकावें असें ठरवून मी निधडेपणानें म्हणालों, " स्पष्ट बोलतों याबद्दल क्षमा कर. पण तुझं माझ्याशीं होत असलेलं वर्तन हें एकपरीनं मला कोडं आहे. अगदीं स्पष्ट बोलायचं, म्हणजे मी विद्वान नाहीं, श्रीमंत नाहीं, आणि कोणत्याही तरुणीला माझ्याविषयीं आकर्षण वाटेल अशी कोणतीही देणगी निसर्गानं मला दिलेली नाहीं. इतकं असूनही तूं माझ्याबद्दल जी आस्था बाळगतेस, जी आपुलकी दाखवितेस, तिचं

मला आश्चर्य वाटत होतं. अकारण आकर्षणावर माझा विश्वास नव्हता. कुठंतरी मनोधर्माची समानता असावी लागते, त्याशिवाय एका जीवाचं पटत नाहीं असा माझा समज आहे. म्हणूनच आजपर्यंत माझा कुणाशींच स्नेहसंबंध जडला नाहीं. जो जडला तो हा तुझ्याशीं. त्याला कारण मी नाहीं—तूं होऊन माझ्याशीं हा संबंध जोडलास! हें असं कां झालं याचं अजूनही मला आश्चर्य वाटतं. तूं विद्वान आहेस, पदवीधर आहेस, श्रीमंत आहेस. कोणत्याच गोष्टीची तुला वाण नाहीं. माझ्यासारख्या एका अकिं-चन माणसाशीं तूं आपण होऊन कां संबंध जोडलास, हें कोडं मला अजूनही उलगडत नाहीं. मी सांगितलंच, कीं मित्र म्हणून मला यापूर्वी कुणीच नव्हते. मैत्रीच्या पहिल्याच परिचयानें मी ओढला गेलों तर त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. तुझ्याप्रमाणं मलाही जिव्हाळ्याचं कुणी नव्हतं. तत्वतः अनाथ असलेल्या दोन व्यक्ती एका जागीं आल्या म्हणूनच हा ओढा—असा मी मनाचा समज करून घेत होतों. पण त्या समजानं माझं समाधान होत नाहीं. हें कोडं उलगडणं तुझ्या हातीं आहे. सांग, कां मला आपल्या स्नेहाच्या पाशांत ओढलंस?"

'तुम्ही' जाऊन 'तूं' केव्हां आलें हें माझें मलाच कळलें नाहीं. त्या 'तूं' नें तिची पकड धरली.

"तुला मी कां ओढलं?" ती आपल्याशींच पुटपुटत म्हणाली, "मला देखील तोच प्रश्न आहे. अकारण आकर्षणावर जसा तुझा विश्वास नव्हता तसा माझाही नव्हता. माझे वडील हयात असल्यापासून मी पहात होतें, आमच्या श्रीमंतीच्या पायीं हजारों लाळघोटे आमच्या भोंवतीं येत होते. त्यांच्या मृत्युनंतर मी स्वतंत्र झालें. ते पूर्वीचे लाळघोटे माझ्याभोंवतीं गुंगारा घालू पहात होते. मी त्यांना झिडकारून लावलें. कॉलेजांतले हे माझे सोबती नंतर माझ्यापुढें येऊं लागले. ती तात्विक मैत्री होती. हार्दीक नव्हती—आजही नाहीं. एका मताचीं माणसं म्हणून आम्ही एका ठिकाणीं गोळा झालों आहोंत एवढंच. तुला मी लायब्ररींत पाहिलं. तुझी एकलकोंडेपणाची वृत्ती मला तिथंच दिसून आली. एकटेपणासाठींच मी हा घोळका माझ्याभोंवतीं गोळा केला होता आणि एकटेपणासाठींच तूं सर्वांशीं फटकून वागत होतास. लायब्ररींत इतकीं माणसं येत होतीं. पण

त्यांची तुझी ओळख सुद्धां नव्हती हें जेव्हां मी पाहिलं, तेव्हां त्या एकट्या जीवाचा एकलकोंडेपणा घालवावा अशी लहर माझ्या अंतःकरणांत स्फुरण पावली. तें अकारण आकर्षण होतं यांत शंका नाहीं. पण तें अगदीं अकारण नव्हतं. ती एकटेपणाची सहानुभूती होती. कित्येकांना एकटेपणासाठीं गर्दी मोडून टाकावी लागते, कित्येक आपला एकटेपणा अबाधित ठेवण्यासाठीं मुदाम गर्दीत मिसळतात, तुझा माझा एकटेपणा सारखाच.—पण तो एकटेपणा यायची साधनें मात्र भिन्न. त्या एकटे-पणाच्या आकर्षणानं आपला हा स्नेहसंबंध जुळला. आतां समजलं ?"

"समजलं !" असें म्हणून मी स्वस्थ राहिलों.

"आतां कां बोलत नाहींस ?" खुर्ची अगदीं माझ्याजवळ ओढून घेत ती म्हणाली.

"माझं कोडं उलगडलं. आतां काय बोलायचं ?" असें म्हणून मी पुनः स्वस्थ बसलों.

ती उठून खिडकीजवळ गेली आणि बाहेर पाहूं लागली. कितीतरी वेळ ती खिडकीवाटे बाहेर पहात होती. मी बसल्या जागेवरून हललों नाहीं.

मान वळवून ज्यावेळीं तिनें माझ्याकडे पाहिलें त्यावेळीं तिचे डोळे आंसवांनीं न्हाऊन निघालेले मला दिसून आले.

मी धांवतच तिच्याजवळ गेलों आणि उद्गारलों,

"नंदिनी, रडतेस ?"

तिला हुंदका आवरतां येईना. माझाही गळा दाटून आला.

काय झालें तें मला कळलें नाहीं, पण नंदिनीचे दोन्ही हात माझ्या गळ्याभोंवती पडल्याचें कळून मी भानावर आलों.

---

## ५

मी घाबरून गेलों. हाताचा विळखा सोडविण्याचें देखील मला धैर्य झालें नाहीं.

त्यावेळच्या माझ्या मनःस्थितीचें वर्णन मला करतां येणार नाहीं. ती भीति होती, आवेग होता, कीं भावनात्मकतेची ग्लानी होती हें मला कांहींच सांगतां आलें नसतें. पण मी अगदीं हतबुद्ध झालों. कोणतीच प्रतिक्रिया माझ्या हातून घडली नाहीं.

कांहीं क्षणानें ती दूर झाली.—माझ्याकडे पाहून ओशाळली आणि दूर एका कोचावर जाऊन बसली.

ती रागावली कीं खिन्न झाली, याचा अंदाज मला करतां येईना. तिच्या भावनावशतेला मी उत्तेजन दिलें नव्हतें. कदाचित् ही गोष्ट तिला अनपेक्षित वाटली असावी.—त्यामुळें कदाचित् माझ्याबद्दल तिच्या मनांत अनादरही उत्पन्न झाला असावा अशी मला शंका आली.

मी त्याच जागीं उभा होतों. मी कांहींच बोलत नाहीं असें पाहून बसल्या जागेवरून उठून माझ्यासमोर येऊन ती म्हणाली, "क्षमा कर, चूक झाली असें मी म्हणणार नाहीं. पण माझा तोल चुकला—"

पुढें कांहींतरी बोलण्याचा ती प्रयत्न करीत होती पण तिला शब्द सुचत नव्हते.

आतां मी बराच सावध झालों होतों.

"क्षमा कसली ?" मी म्हटलें "हें असं व्हायचंच ! केव्हांतरी असं कांहींतरी होणार अशी शंका मला होतीच. सर्वसाधारण स्नेहापेक्षां

आपलं उभयतांमधलं आकर्षण जास्त आत्यंतिक आहे याची मला जाणीव होती. पण, तुझा असा तोल सुटेल असं मला वाटलं नव्हतं—"

"मलाही वाटलं नव्हतं." नंदिनी म्हणाली, "भावनेला बळी पडणं म्हणजे मनाचा कमकुवतपणा असं मी म्हणत असें. तात्विक दृष्ट्या मी या कमकुवतपणाची वरंवार चर्चाही केली होती—पण माणसाच्या आयुष्यांत केव्हां असे अतिप्रसंग येतात हें कांहीं सांगून येत नाहीं. आतां मी भानावर आलें आहें—सावध झालें आहें—पण त्यावेळीं काय झालं कुणाला ठाऊक—-" ओशाळून खालीं पहात ती बोलत होती.

"तोल सुटला खरा. कशी गैरसावध झालें मी—" काकुळत-वाण्या दृष्टीनें वर माझ्याकडे पहात ती म्हणाली, "राग नाहीं ना आला माझा?—अनादर नाहीं ना वाटला?—"

"मी हेंच विचारणार होतों." मी हंसत हंसत म्हटलें. मी कां हंसलों हें माझें मलाच कळलें नाहीं.

पण माझ्या हंसण्याचा तिच्या मनावर परिणाम झाला. तिच्या चेहऱ्यावरील पहिली कळा मावळली. ती जरी हंसली नाहीं तरीही हंस-ण्याच्या पूर्वीची संवेदना तिच्या चेहऱ्यावर दिसत होती.

"दोघंही आपण एकमेकांना भ्यालों!" असें म्हणतांना मात्र तिला हंसू आवरतां आलें नाहीं.

पलीकडली खुर्ची ओढून मी तिच्यापुढें केली आणि शेजारच्या स्टूलावर बसत मी म्हटलें, "खरं आहे तें! मी तरी भ्यालों यांत शंका नाहीं. असले प्रसंग आपण कादंबऱ्यांतून वाचतों. प्रत्यक्ष असं कांहीं घडत असेल असा माझा समज नव्हता—" पुढें काय बोलावें तें मला सुचेना.

पायांतील स्लीपरची खोंट, टांचा वर करून जमिनीवर घांशीत नंदिनी वर पाहात म्हणाली, "मग आतां?"

"तुझा साम्यवाद काय सांगतो?" मी खंवचटपणें विचारलें, "साम्यवादांत हें असलं कांहीं येतं कीं काय मला माहीत नाहीं. साम्य-वादी लोकांच्या कादंबऱ्यांत मात्र असले प्रसंग आहेत. तात्विक पुस्तकें आणि सामाजिक इतिहास या दोहोंचा मेळ कधीं कुणी घालून पहात नाहीं. वेदांताचीं गूढ तत्वं चघळीत बसणारांचींदेखील लग्नं झालीं आहेत—

वेदांत्यानांसुद्धां पोरंबाळं झालीं आहेत. ब्रह्म, सत्य आणि जगत् मिथ्या म्हणणाऱ्यांनीं देखील चांगले संसार थाटले आहेत. साम्यवादी त्यांच्याच पंक्तीला बसतात कीं काय तें मला माहीत नाहीं."

"तुम्ही नाहीं का साम्यवादी?"

"मी साम्यवादी नाहीं—वेदांतीही नाहीं, कीं समाजसुधारकही नाहीं. स्वतःचा प्रपंच मला माहीत नाहीं. जगाच्या संसारांत मी पडलोंही नाहीं. हें सारंच कांहीं मला नवीन आहे."

"संसारी व्हावं असं नाहीं कां तुम्हांला वाटत?"

"तुला वाटतं का संसारी व्हावं असं?"

"एकलकोंडेपणाला मी अगदीं कंटाळलें आहें." ती एक दीर्घ निःश्वास टाकून उद्गारली.

"कां बरं?" मी थोडया कुत्सितपणानें विचारलें, "रोज गडबड चालली आहे इथं. सारा दिवस कुणाची ना कुणाची तरी सोबत असतेच. इतर वेळीं आपण जातोंच आहों कीं फिरायला!"

"हो! सारा दिवस!" ती पुनः एक निश्वास टाकून म्हणाली, "पण माझ्या प्रश्नाचं उत्तर नाहीं दिलंत?"

मी मोठ्या पेंचांत पडलों. प्रकरण हातघाईला आलें होतें कोर्टींग वगैरे असं कांहीं म्हणतात, तें तत्वत बरेचसें होऊन गेलें होतें. एकमेकांचा एकमेकांना खूप परिचय झाला होता. मला प्रश्न पडला तो हाच, कीं अशा परिचयानें एकमेकांचीं अंतरंगें एकमेकांशीं पूर्णपणें पडताळतां येतात का?

मी स्पष्टपणें तिला तसें विचारलें, तेव्हां ती म्हणाली, "चिकित्सक दृष्टीनें मी पाहूं लागतें त्यावेळीं मला असं वाटतं, कीं आपण एकमेकांना चांगलं ओळखलं आहे. सहवास झाला आहे पण घनिष्ठता नाहीं एवढंच, कुठं तरी संकोच अजून बाकी राहिला आहे. अजून मन मोकळं करून आपण एकमेकांशीं बोललों नाहीं; यापुढं तसं आपण बोलूं या. एकमेकांनीं एकमेकांकडून कांहींसुद्धां चोरून ठेवायचं नाहीं; मनांत येईल तें अगदीं स्पष्टपणें विचारायचं. परीणामाची कदर बाळगायची नाहीं. आहे कबूल?"

"कबूल!" मी निश्चयपूर्वक म्हटलें. मलाही हा प्रयोग करून

पाहायचा होता.

तिचें म्हणणें अक्षरशः खरें होतें. संकोच पूर्णपणें दूर झाला नव्हता—निदान मी तरी संकोचानें वागत होतों यांत शंका नव्हती. संसार थाटण्याच्या गोष्टी दूर राहोत, पण एकमेकांचं एकमेकांशीं कितपत पटतें याचा पडताळा घ्यायला काय हरकत आहे ?

पुनः एक कल्पना माझ्या मनांत आली.

मी म्हटलें, " सारा संकोच सोडायचा — पण तो मनाचा. मनांत कांहीं चोरून ठेवायचं नाहीं. बोलतांना शब्दांचीसुद्धां फारकत करायची नाहीं. पण आपणा उभयतांची पूर्ण कसोटी लागेपर्यंत 'तें तसलं' कांहीं पुन्हा होऊं द्यायचं नाहीं, एवढं ध्यानांत ठेव."

नंदिनी हंसली. त्या हंसण्यांत साधारण स्त्रीसुलभ मार्दव ओतप्रोत भरलें होतें. साम्यवादी नंदिनीचा मागमूससुद्धां राहिला नव्हता.

पूर्वींच्यासारख्या खेपा सुरू झाल्या. एकमेकांशीं वागण्याचें धोरण पूर्वींप्रमाणेंच राहिलें होतें. साम्यवादी मित्रमंडळी पूर्वींसारखीच येत होती. तशीच चर्चा चालत होती. मधला तो तेवढा प्रसंग आम्ही उभयतांनीं अंतःकरणाच्या कुठल्या तरी गुप्त कप्प्यांत लपवून ठेवला होता. त्याची आठवण पुसली गेली नव्हती—नव्हे ती आठवण अगदीं जळत्या ज्योती-सारखी माझ्या अंतःकरणांत तरी धगधगत होती. मला आश्चर्य वाटत होतं तें हेंच, कीं विसरणं इतकं कठीण कां व्हावं ? आयुष्यांतल्या कितीतरी गोष्टी मी विसरून टाकल्या होत्या. आज सुखासमाधानानें राहण्या-साठीं ज्या वडिलांनीं पुंजी करून ठेविली होती त्यांची आठवणसुद्धां मी विसरून गेलों होतों. अभ्यासक्रमांतलें जीवन, त्यावेळची मैत्री, त्यावेळचीं तीं सुखदुःखें, सारीं कांहीं नाहींशीं झालीं होतीं.

पण ही लहानशी आठवण मात्र मला विसरतां येईना. तिला विचा-रलें तेव्हां तीही म्हणाली " तेवढंच मला कठीण जातंय्. चार-चौघांत बोलत असतें. मोठमोठ्या गहन विषयांची चर्चा करीत असतें, तितक्यांत कुणी तरी डिवचल्यासारखं वाटतं. पटकन् आठवण जागी होते आणि अंगावर रोमांच उभे रहातात. कधींच असं झालं नव्हतं मला—" ती आपल्याशींच हंसून म्हणाली, " आणि व्हायचं तरी कसं. असला अनु-

भव कधींच आला नव्हता. कधींच कुणाबद्दल असं वाटलं नव्हतं—"

तिचें तें उत्तर ऐकत असतां मला तंद्री लागली. कां असं व्हावं हेंच मला कळत नसे

केव्हां केव्हां मला मोठा अभिमान वाटे. सुंदर, तरुण, विद्वान आणि श्रीमंत असलेले कितीतरी मित्र तिच्याभोंवतीं गोळा होत होते. त्या सर्वांना टाकून तिची नजर माझ्याकडेच कां वळली ? काय असं माझ्यांत विशेष आहे म्हणून अशा अभिमानी तरुणीनें माझ्यासाठीं आपला अभिमान विसरावा ?

तितक्यांत एक वावटळ उठली. गोलमेज परिषद भरायचें घाटत होतें. परिषदेला पुष्कळांचा विरोध होता. मॉंटेग्यूसाहेब मुंबईच्या किनाऱ्यावर उतरले. कित्येकांनीं त्यांच्यापुढें लोटांगणें घेतलीं. कित्येकांनीं त्याची खिजगणती धरली नाहीं. हिंदुस्थानच्या राज्यकारभारांत कांहींतरी फरक होणार यांत शंका नव्हती. पण तो फरक कसा होणार आणि हिंदुस्थानला त्यापासून किती फायदा होणार याच्याबद्दल प्रत्येकाला शंका वाटत होती.

म्हणून तोच विषय चर्चेचा होऊन बसला होता. गोलमेज परिषदेवर बहिष्कार घालावा असें अर्थांतच साम्यवादी लोकांना वाटत होतें. कॉंग्रेसवालेही बहिष्काराच्या बाजूचेच होते. पण त्यांत कांहीं फाटाफूट होती. प्रागतिकांचा ओढा सहकार्याशीं होता. पण एकंदरींत बहिष्कारवादीच जास्त होते. त्यामुळें साम्यवादी लोकांना चांगला आधार वाटत होता.

राजकारणाच्या चर्चेची आत्यंतिकता वाढवायला हा विषय इतका महत्त्वाचा होता, कीं त्यामुळें नंदिनी इतर गोष्टी विसरून गेली. सारखीं व्याख्यानें सुरू होतीं. तेवढ्यांत आमची ही मित्रमंडळी प्रामुख्यानें भाग घेत होती.

तितक्यांत आणखी एक आपत्ती आली. कित्येक साम्यवादी पुढाऱ्यांना अगदीं अचानक एके दिवशीं अटक करून मीरतला नेण्यांत आलें. खरीं कळकळीचीं साम्यवादी माणसें एकदम दुरावल्यामुळें आमच्या चर्चावादी तरुणांना हताशपणा आला असल्यास नवल नाहीं.

एकामागून एक निरनिराळ्या ठिकाणचे निरनिराळे साम्यवादी पक-

हून मीरतला नेण्यांत येत होते. खटल्याची तयारी मोठ्या जारीनें सुरू होती. हिंदुस्थान आणखी विलायत यांतले राजकारणाचे धागेदोरे गुंफले जात होते.

खटल्यांच्या हकीकती वाचण्यांत काळ घालविण्यापलीकडे आमची ही मित्रमंडळी विशेष कांहीं करीत नव्हती. प्रत्येकाला कांहीं ना कांहीं तरी कारणानें भिती वाटत होती. कुणी मागें राहून कार्य करण्याचा आव आणीत होते, कुणी आपला दुबळेपणा प्रामाणिकपणें कबूल करीत होते, तर कुणी एकमेकांकडे साशंक नजरेनें पहात होते. पूर्वी या मंडळांत दिसत असलेली जूट बहुधा नाहींशी झाली होती.

असेच आणखी कांहीं दिवस गेले. व्याख्यानें, चर्चा थंडावल्या होत्या. राजकारणापेक्षा सर्वसाधारण वाङमयाकडे आमच्या या साम्यवा-द्यांचें लक्ष वेधलें होतें. अंत:करणांतील अगदीं आवडती वृत्ति अशा प्रकारें थंडावल्यामुळें नंदिनी दिवसेंदिवस आपल्या या तरुण मित्रांबद्दल उदासीन होऊं लागली होती.

एके दिवशी ती मला म्हणाली, “खरोखरच मी हल्लीं हतबुद्ध झालें आहें. चढावाच्या धोरणाशिवाय माझें समाधान होत नाहीं. पण आतां पहावें तों जो तो अंगचोरी करतो आहे. ही अगदीं आणीबाणीची वेळ आहे असं मला तरी वाटतं. यावेळीं कातडी बचावण्याचें धोरण बाळगून कसं चालेल ? पूर्वीच जर मी या चळवळींत पुढाकार घेतला असता तर आज मीरतच्या तुरुंगांत असतें. केवढा हेवा वाटतो मला त्या लोकांचा. साऱ्या जगाच्या चर्चेचा विषय होऊन राहणं हें कांहीं थोडं भाग्य नव्हे—पण मी त्या भाग्याला मुकलें. विचार करण्यांत निष्कारण वेळ घालवला. अगदीं वीट आला आहे या लोकांच्या बडबडीचा मला. नुसता काथ्याकूट करतात बेटे कसा जीव तळमळतो आहे माझा !”

मला तिच्या बोलण्याचें हंसूं आलें. मी म्हणालों, “एकट्या माणसाच्या तळमळीचं हें काम नाहीं. सारा हिंदुस्थान जागा झाला पाहिजे. प्रत्येक माणसानें उडी घेतली पाहिजे धडाडीनं ! आतां हे तुझे मीरतचे पुढारी—खरोखरच त्यांच्याबद्दल मला मोठा अभिमान वाटतो. पण आजवर त्यांनीं काय केलं ? धडाडी दाखवली खरी पण ती नुसती मुंबईपुरती—मुंबईच्या

मजुरांचा पाठींबा मिळाला म्हणून. अखिल भारतीय नजर ठेऊन सारा हिंदुस्थान जमा करण्याकरितां कांहींतरी केलं पाहिजे होतं, तें काय केलं पाहिजे होतं तें मला सांगतां यायचं नाहीं. वंग-भंगाच्या चळवळीच्या हकीकती मी वाचल्या आहेत—त्यावेळीं एकजात हिंदुस्थान जागा झाला होता. —त्यानंतरची होमरूलची चळवळ—बेझंटबाईंनी सुरू केली आणि टिळकांनी ती जगवली. लढाई सुरू झाली आणि त्या चळवळीवरही विरजण पडलें. आतां लढाईचाच हक्क पुढें सुरू झाला आहे. नव्या राज्यघटनेचे फाटे फुटताहेत. ही संधी मोठी नामी आहे. या संधीचा फायदा घेणारा आणि त्या फायद्याच्या जोरावर सारा हिंदुस्थान खडबडून जागा होईल अशी कांहीतरी चळवळ करणारा कुणी निघाला पाहिजे. अशी ही कांहीतरी चळवळ हे आमचे साम्यवादी करतील असं मला वाटलं होतं पण त्यांच्याकडून तें घडलं नाहीं. कांहीं तरी चूक झाली यांत शंका नाहीं. मला वाटलें, या साम्यवाद्यांत कुणीतरी दगलबाज निघाला असावा. ही केस झाली नसती तर आजच्या राजकारणाला निराळीच दिशा लागली असती असं मला निश्चयपूर्वक वाटतं—"

नंदिनीकडे अगदीं अंत:करणपूर्वक टक लावून पाहात मी म्हणालों, "आतां तूंच कां पुढं येऊं नये ?"

नंदिनीचा चेहरा एकदम उतरला.

"मीच ?" ती घाबरलेल्या आवाजानें म्हणाली, "मीच ? माझी योग्यता आहे का ती ? मीरतच्या खटल्यापासून मी विचार करतें पण माझी मलाच परीक्षा होत नाहीं. मी काय करणार ? कोण मला ओळखतंय ? कोण माझं ऐकणार आहे ? आणि मी पुढं होऊं तरी कोणत्या आधारावर ? खरोखरच मला पश्चात्ताप होतो. त्यांच्या शेजारीं त्यावेळीं उभी राहिलें असतें तर आज मला बोलायला कांहीं अधिकार आला असता !"

"बाहेर राहिली असतीस तर !" मी आणखी संथपणें म्हणालों, "डांग्यांच्या शेजारीं उभी असतीस तर आज मीरतच्या तुरुंगात खितपत पडावं लागलं असतं. मागं राहातां आलं नसतं—"

"पण कांहीं मागं राहिलेच आहेत ना ?"

"त्यांतले कांहीं लबाड आहेत, कांहीं दगलबाज आहेत आणि

कांहीं भेकड आहेत. तूं तशी मागं राहाणार होतीस का ?"

" केव्हांही नाहीं. " नंदिनी निश्चयात्मकतेनें म्हणाली, " त्यापेक्षां तुरुंगांत गेलेलं काय वाईट—मेलेलं काय वाईट ? जीव कसा तळमळतोय्. काय करावं कांहीं सुचत नाहीं—"

पुनः पुन्हा आम्ही तेंच तेंच बोलत होतों. पण त्यांतून निष्पन्न काय होणार होतें ?

मला आनंद झाला तो एवढाच, कीं नंदिनीच्या तळमळीमुळें तिच्या भावनात्मकतेला थोडा आळा पडला होता मला तेवढेंच समाधान वाटत होतें. सार्वजनिक जीवन आणि कौटुंबिक जीवन या दोहोंच्या झगड्याचें पर्यवसान काय होतें हेंच मला पाह्यचं होतं.

मला पाहिजे होतें तें चालून आलें. मिठाचा सत्याग्रह करण्याचें गांधींनीं ठरविलें.

सारा हिंदुस्थान एकदम खडबडून जागा झाला जिकडे तिकडे चैतन्य दिसूं लागलें. जिकडे तिकडे लढाईची तयारी सुरू झाली. माझ्या तटस्थ दृष्टीला तो लढा वाटला नाहीं.

ती लढाई होती-निःशस्त्रांची लढाई होती—निःशस्त्र प्रतिकाराच्या अनत्याचारी चळवळीनें हिंदुस्थानवासीयांच्या अंतःकरणांत धुमसत असलेली स्वातंत्र्याची ज्योत शिलगावली जात होती.

लढाई सुरू झाली होती.



# ६

सारा हिंदुस्थान खडबडून जागा झाला होता. पण विशेषतः मुंबईतील जाग्रती इतर कोणत्याही ठिकाणापेक्षां कांहीं निराळीच होती.

गिरगांव बॅकरोडकडे जाणाऱ्या रस्त्यावर माणसांची सारखी झुंबड लागलेली असे. ज्या कॉंग्रेस हाऊसकडे पूर्वी कोणी पहातसुद्धां नसे तें कॉंग्रेस हाऊस म्हणजे मुंगीच्या वारुळासारखें माणसांनीं फुलून निघालें होतें.

आणि विशेष आश्चर्याची गोष्ट ही, कीं पुरुष आणि बायका सारख्याच प्रमाणांत भाग घेत होत्या. मला आश्चर्य वाटत होतें तें गुजराती बायकांचें ! कधींही घराबाहेर न पडणाऱ्या या बायका—कधीं बाहेर निघाल्याच तर डोक्यावरचा पदर पुनः पुनः ओढीत, लचकत, मुरडत—रस्त्यावरून जाणाऱ्या पुरुषांची नुसती झुळूक दिसली तर लाजाळूच्या झाडासारख्या मॅगळून पडणाऱ्या त्या गुजराती बायका—म्हाताऱ्या, तरण्या आणि मुली—केशरी साड्या नेसून, पोलीसांच्या थव्याला न जुमानतां कॉंग्रेस हाउसच्या कंपाउंडांत जेव्हां तळपतानां दिसूं लागल्या तेव्हां मी तर हतबुद्धच होऊन गेलों. मला वाटलें, जगावर आतां अनर्थ माजणार ! गोगलगाई सुद्धां शिंगें रोखूं लागल्या!

ती गडबड सुरू झाल्यापासून नंदिनी आपली मोटार घेऊन एकटीच प्रॉक्टर रोडनें कॉंग्रेस हाऊसला वळसा देत इन्स्पेक्टरसारखी तपासणी करीत फिरत असे. तिचे साम्यवादी मित्र हल्लीं फारसे येत नसत. मला वाटलें होतें, कीं ते या चळवळींत सामील झाले.

पण वस्तुस्थिती तशी नव्हती. हा लढा सुरू झाल्यापासून नंदि-

नीचीं पूर्वीची मतें बदलूं लागलीं होतीं — म्हणजे पूर्वीचीं मतें तिनें अजीबात सोडलीं होतीं असें नव्हे, तर पूर्वीच्या मताच्या जोडीला त्या तीस–साली चळवळीनें आणखी कांहीं नवीन जोड्या दिल्या होत्या.

एके दिवशीं मला घेऊन जाण्यासाठीं ती माझ्या घरीं आली. त्या वेळीं तिच्या अंगावर खादीची साडी पाहून मी आश्चर्यचकीत झालों.

तिच्या तें ध्यानीं आलें आणि ती म्हणाली, "एवढे डोळे वटारून काय पाहातां ? अजून पांढरीच आहे--उद्यां केशरी होईल तेव्हां समजेल !"

" म्हणजे तूं त्या केशरीयांत घुसणार आहेस कीं काय ?"

" काय बिघडलं त्यांत ? कसं अगदीं मरतुकड्यासारखं वाटत होतं. जिवंतपणा आल्यासारखा वाटतो आहे. जिकडे तिकडे कसं सळसळून निघाल्यासारखं वाटतं. तुम्हांला नाहीं असं वाटत ? तुम्हांला नाहीं हुरूप येत ? तुम्हांला नाहीं वाटत, कीं यांत उडी घ्यावी म्हणून ? रोज पकडून माणसं तुरुंगांत पाठवितात, वॉर कौन्सिलं नेमलीं आहेत, रोज बदलताहेत ती कौन्सिलं. आणि माणसं तरी काय तुरुंगांत जाताहेत ! चार दोन नव्हेत—दहा पांच नव्हेत—शेंकड्यांनीं ! शेंकडों माणसं चाललीं आहेत रोज तुरुंगांत. सळसळत नाहीं तुमचं रक्त ?"

तिचा तो उत्साह पाहून मला मोठा अभिमान वाटला खरा, पण स्थितप्रज्ञाचा आव आणून अगदीं शांतपणें मी म्हणालों, "माझं रक्त फार थंड आहे. चांगली सडकून आंच लागल्याशिवाय तें सळसळायचं नाहीं—"

"आणखी आंच ती काय लागायची !" ती मोठ्या आवेशानें म्हणाली, "काय तोफांचे गोळे पडायला पाहिजेत ? पाहिलं आहे का—रोज रक्त पडतंय या मुंबईच्या भूमीवर—लढाईशिवाय रक्त सांडतं—" जसं कांहीं तें दृश्य तिच्या नजरेसमोर दिसत होतें ! ती बोलत होती, "जिकडे तिकडे जिवंतपणा आला. गांवाचं रक्षण करायचं काम टाकून हात वर न करणाऱ्या माणसाची टाळकी शेकीत पोलीस पिसाळल्यासारखे फिरताहेत. आणि गांवाचं रक्षण चालवलं आहे खादीवाल्या स्वयंसेवकांनीं ! जसा कांहीं मुंबईचा ताबाच घेतला आहे या हिंदुस्थानी सेवादलानं ! पोलीस

आले, कीं परचक्र आल्यासारखं वाटतं. आणि त्या परचक्राचा प्रतिकार कोणीच करीत नाहीं. मोठी गंमत वाटते मला. मारामारी होते—रक्त सांडतं—पण फटका बसतो एका बाजूनं आणि दुसरी बाजू कशी तटस्थ राहते. लढाई म्हणजे दोघांनीं झगडायचं पण इथं पहावं तर एक मारतो आणि दुसरा स्वस्थ रहातो. म्हणूनच मला गंमत वाटते. मोठी अजब लढाई आहे ही—"

निराळया जागीं झालेल्या या अनत्याचारी चकमकीच्या हकीकति सांगतांना तिला जें स्फुरण चढत होतें तें पाहून मी घाबरून गेलों. आतापर्यंत ती नुसतें प्रेक्षकाचें काम करीत होती. नुसतीच पहात होती आणि बोलत होती. नुसती बातमीदाराचें काम करीत होती.

पण आजचा तिचा आवेश अगदीं निराळा होता. मला वाटलें, दुसरा दिवस उजाडायच्या पूर्वी ही केशरी चढवून तुरुंगांत जाणार! शेंकड्यांनीं, हजारांनीं माणसें तुरुंगांत जात असतां आपण बाहेर रहावें हें तिला पटत नव्हतें. कोणी मिठाचा सत्याग्रह करीत होते, कुणी दारू दुकानावर पिकेटींग करीत होते, कुणी विलायती कपड्याच्या दुकानावर पिकेटींग करीत होते. आणि या पिकेटींग करणाऱ्यांपैकीं प्रत्येक माणसाला तुरुंग पहावा लागत होता.

सकाळच्या प्रभातफेऱ्या निघत होत्या दुपारीं कॉंग्रेस बुलेटिन्स वाटलीं जात होतीं आणि संध्याकाळीं मोठमोठ्या मिरवणुकाही निघत होत्या. मुंबईच्या प्रत्येक भागांत रोज रात्रीं व्याख्यानाची झोड उठत होती.

तसा मी भावनावश असतों तर मीही सळसळून उठलों असतों—मीही या खाईत उडी टाकली असती—इतकें वातावरण तंग झालें होतें.

तीनचार दिवसपर्यंत नंदिनी नित्याप्रमाणें मुळींच आली नाहीं. बंगल्यावर जाऊन चौकशी केली तेव्हां ती रात्रीं केव्हां तरी झोंप घेण्यासाठीं घरीं येते असें कळलें. तिच्या मोटारीसुद्धां कॉंग्रेस हाऊसमध्यें पडल्या होत्या. माळ्यानें सांगितलें कीं ती बहुधा पायींच घरीं येते.

मला आश्चर्य वाटलें! पायीं चालण्याचा तिला तिटकारा होता—इतकेंच नव्हे तर एवढें दूर अंतर चालण्याइतकी तिची चालायची संवयसुद्धां मोडून गेली होती. म्हणूनच, ती चालत घरीं येते याचें मला आश्चर्य वाटलें.

चांगली पांचसहा दिवस तिची माझी भेट झाली नव्हती. मी तिचा तपास करीत सारखा हिंडत होतों. पण देशसेविकांच्या घोळक्यांतून फिरतांना ती मला कुठेंच दिसली नाहीं.

कॉंग्रेस हाऊसच्या आवारांत मी अजून गेलों नव्हतों. पण चौव-कशी करावी म्हणून तिथेंही गेलों. आवारांत ती कुठेंच दिसली नाहीं. त्या आवारांतल्या साऱ्या माणसांच्या अंगावर खादी चढली होती. जिकडे तिकडे खादीच्या लाटा आणि त्यांतून मधून मधून चमकणाऱ्या केशरी साडयांच्या लहरी दिसत होत्या.

पण नंदिनी कुठेंच दिसली नाहीं म्हणून मी वर ऑफिसांत गेलों.

ऑफिसांत पाहिलें तर लहानमोठ्याचा भेद नव्हता—गरीब श्रीमं-तांचा भेद नव्हता—श्रीमंत माणूस दारावर शिपायासारखा राहिला होता तर मध्यम स्थितीतला एकाद तरुण खुर्चीवर बसून त्याला हुकूम सोडीत होता. आणि आश्चर्य हेंच कीं, ते हुकूम पाळले जात होते.

मी आंत गेलों आणि पाहिलें, तों केशरी साडी नसून नंदिनी एका खुर्चीवर बसली होती. तिच्या टेबलासमोर बरेचसे स्वयंसेवक उभे होते.

मोठ्या जोरजोरानें त्यांची चर्चा चालली होती—मी दुरूनच पहात होतों.

तिनें मला पाहिलें, पण पाहून न पाहिल्यासारखें केलें.

तिच्या हुकुमासरशी सारे स्वयंसेवक मोठ्या शिस्तीनें बाहेर निघून गेले. मी जाऊन तिच्या टेबलाजवळ उभा राहिलों तेव्हां अगदीं अस्सल ऑफिसरी थाटानें तिनें विचारलें, " काय आहे ? नांव नोंदवायचं आहे ? सेवादलांत कीं पिकेटर्समधें ?"

मी क्षणभर स्तब्ध राहिलों. ती म्हणाली, " Will you spit it out.?"

मी गंभीरपणें उद्गारलों. "नंदिनी"!"Excuse me" असें म्हणून ती उठून निघून गेली. मी अगदीं सर्द झालों ! मला थोडा रागही आला. वरचढपणाचा तिनें आणलेला आव मला आवडला नाहीं. खोटें बोलणें हा तिचा स्वभाव नव्हता. चारपांच दिवसांत केवढा फरक झाला हा तिच्यांत ?

मी ऑफिसांतून बाहेर आलों. जिकडे तिकडे येण्याजाण्याची वर्दळ

सुरू होती. प्रत्येकजण अगदीं घाईत होता. मोटरी भरभरून बाहेर जात होत्या.

मोटरी भरभरून आंत येत होत्या. निरनिराळीं खातीं उघडलीं होतीं आणि त्या खात्यांतून कांहीं ना कांहींतरी वर्दळ सारखी सुरू होती.

त्या वातावरणानें मलासुद्धां क्षणभर भारून सोडलें. माझें थंड रक्त देखील सळसळतें आहे असें मला वाटूं लागलें. मी प्रत्येक खात्यांत डोकावून पहात होतों. मुद्दाम विचारल्याशिवाय कुणीच कुणाची चौकशी करीत नव्हता.

कितीतरी वेळ नंदिनी पुन्हां दिसली नाहीं. आणि ज्यावेळीं दिसली त्यावेळीं केशरी साड्या नेसलेल्या बायकांची भली मोठी फरड तिच्या बाजूला उभी होती. ती हुकूम सोडीत होती आणि लॉऱ्या भरून बायका पाठवल्या जात होत्या.

सारा तांडा निघून गेल्यावर मी तिची गांठ घेतली. तेव्हां ती म्हणाली, "यावेळीं मी डयूटीवर आहें. माझ्या कामांत व्यत्यय करूं नका.'

'तुझी भेट तरी केव्हां आणि कुठं होणार?' मी आतुरतेनें विचारलें.

" तुरुंगातून आल्यावर !" असें म्हणून ती निघून गेली.

तिचा तो आवेश पाहून मी चकीत होऊन गेलो. नंदिनी अगदीं बदलून गेली होती. गोणपटाइतकी जाड केशरी रंगाची खादीची साडी ती अंगावर बाळगते तरी कशी, याचें मला आश्चर्य वाटलें. तलम कपड्याची तिला मोठी आवड होती. अगदीं तलम रेशमी साडीखेरीज ती दूसरी साडी कधीं नेसत नसे.

आणि मला आश्चर्य वाटलें तें हेंच, कीं त्या खादीच्या साडीचा जाडपणा तिला जाणवत नव्हता. मी दुरून पहात होतों. तिला भेटायला एकामागून एक कितीतरी बायका येत होत्या. नुसत्या एकदोन शब्दांत ती त्यांची बोळवण करीत होती. तिचा बोलकेपणा अगदीं नाहींसा झाला होता.

बाजूला उभा राहून मी सारखा पहात होतों. खादीचे खाकी युनिफॉर्म घातलेले स्वयंसेवक तिला मुजरा करून जात असतांना जेव्हां मला दिसून आलें, तेव्हां वाटलें, कीं तिच्या हातीं कसला तरी बडा अधिकार आला असावा. मी हळूच एका स्वयंसेवकाला विचारलें. तो म्हणाला, " ती

होय ! मला नांव माहीत नाहीं तिचं—इथं कुणाचीं नांव कुणाला माहीत असतात म्हणा!–मोठी श्रीमंताची मुलगी आहे म्हणतात. पण तिच्यासारखी खंबीर बाई दुसरी कुणी सांपडायची नाहीं इथं. अगदीं परवांच आली पण मोठी छाप बसवली आहे तिनं! अशी हुकमत चालवते सर्वांवर ! पिकेटींगला माणसं पाठवाचं काम तिच्याकडे आहे"—नंदिनी भेटत नाहीं म्हणून मी मनांतून जरी हताश झालों होतों तरी तिला इथं मिळालेला हा दर्जा पाहून मला एकप्रकारचा अभिमान वाटला. कुणालान कुणाला तरी मी पुन: पुन: तिच्याबद्दल विचारीत होतों आणि प्रत्येकजण तोंड भरून तिची स्तुती करीत होता.

मी पहात उभा होतों तितक्यांत अग्रभागीं गोरा सार्जंट असलेली एक पोलीसची तुकडी आंत आली आणि जिना चढून सरळ वर ऑफिसांत गेली.

एकदम तिकडे गडबड सुरु झाली. सारीं माणसें मुख्य ऑफिसच्या दाराकडे लोटलीं. जिकडून तिकडून जयजयकाराची एकच झुंबड उडाली.

चारपांच माणसांना पकडून पोलीस जेव्हां खालीं उतरले तेव्हां जय जयकाराच्याँ आरोळ्यांनीं सारें आवार दणाणून गेलें. हार घेऊन माणसें भराभर धांवत येऊं लागलीं—जसे कांहीं हार घेऊन सारे वाटच पहात होते--पकडलेल्या लोकांच्या गळयांत हारावर हार घातले जात होते. मुख्य माणसाच्या--डिक्टेटरच्या गळयांत हार घालण्यासाठीं नंदिनी पुढें सरसावली असें जेव्हां मी पाहिलें, तेव्हां माझा जीव खालीं पडला.

आज तरी नंदिनी पकडली गेली नव्हती. सारा घोळका निघून गेला. मी इकडे तिकडे पाहिलें पण मला नंदिनी पुन: दिसली नाहीं.

निराश होऊन मी घरीं परतलों. त्यावेळीं माझें हृदय भरून आलें होतें. तिनें खाईत उडी घ्यावी आणि मी घरीं स्वस्थ बसून रहावें याबद्दल माझी मलाच लाज वाटत होती.

त्या रात्रीं मला झोंप लागली नाहीं. मनांत विचारांचें तुंबळ युद्ध सुरू झालें होतें. भावनात्मकता आणि व्यवहार--देशभक्ती आणि स्वार्थ–सौख्य आणि क्लेश—सुखासीन जीवन आणि कठोर देहदंड, यांतलें काय पत्करावें, हें मला निश्चित ठरवतां येत नव्हतें.

प्रश्न हा होता कीं चुकतें आहे कोण ? मी कीं नंदिनी ! हा तिचा दांभिकपणा होता का ? गांधींचीं तत्त्वें तिला पूर्वी मान्य नव्हतीं, खादीचा तिला तिटकारा होता, अनत्याचारावर तिचा विश्वास नव्हता, सामुदायिक जीवनाचा तिला अनुभवसुद्धां नव्हता.

मग ती या चळवळींत सामील कां झाली ? कां तिनें मला सांगूं नये ? जें मनांत येईल तें मोकळपणानें एकमेकांना सांगायचें असें आम्ही ठरवलें होतें ना ! मग कां तिनें आपलें वचन मोडावें !

ती तळमळ मला अनावर झाली. मध्यान्ह रात्र झाली होती तरीही मी उठलों आणि नंदिनीच्या बंगल्याकडे निघालों.

——:०:——

# ७

मी सारखी बेल वाजवीत होतों. पण बंगल्याचें दार उघडलें गेलें नाहीं!

मला आश्चर्य वाटलें. यापूर्वी असें कधींच झालें नव्हतें.

मी इकडे तिकडे पाहूं लागलों—मोटरघराच्या बाजूला जाऊन पाहातों तों एकही मोटर तिथें नव्हती. मला वाटलें, नंदिनी कॉंग्रेस हाऊस-मधून मुळीं आलीच नसेल!

काय असेल तें असो,—एकंदरीत तें मला बरें वाटलें नाहीं. मनाचे संस्कार हे असे असतात. भर मध्यान्ह रात्र उलटून जाईपर्यंत एका तरुण आणि स्वतंत्र मुलीनें कुठेंतरी भटकत रहावें ही कल्पना मला रुचली नाहीं.

तसें पाहिलें तर असल्या गोष्टीची उठाठेव करण्याची मला काय जरूर होती? मी कांहीं तिचा पालक नव्हतों किंवा नातेवाईकही नव्हतों. तिचा माझा कांहींच संबंध नव्हता.

संबंध नव्हता कसा? कांहीतरी विशेष गोष्ट घडली होती. त्या एका नाजूक प्रसंगामुळें आम्ही दोघांनीं आपसांत कांहीं ठराव केले होते. ते पाळण्याबद्दल आम्ही बांधलेले होतों—आणि दिलेला शब्द मोडण्याइतकी नंदिनी बेजबाबदार वृत्तीची नव्हती.

पण ही चळवळ सुरू झाल्यापासून, मला वाटलें, तिची ती वृत्ती राहिली नाही. परिणाम चळवळीचा कीं तिच्या स्वभावधर्माचा, याचा उलगडा मला होईना.

मीं निश्चय केला, कीं काँग्रेस हाऊसमध्यें जाऊन चौकशी करावी. प्रस्तुतच्या परिस्थितींत काँग्रेस हाऊसमधें दिवस रात्रीचा भेद राहिला नव्हता. तशीच कांहीं विशिष्ट परिस्थिती निपजली नसेल कशावरून?

प्रश्न पडला, जायचं कसं? जवळपास कुठं टॅक्सी किंवा व्हिक्टोरिया मिळण्याचा संभव नव्हता. टॅक्सीच्या स्टँडपर्यंत पायींच जाण्याचें ठरवून मी तसाच निघालों. येतांना आणलेली टॅक्सी सोडून दिल्याचा मला पश्चात्ताप झाला. त्या भागांत नुसता शुकशुकाट होता.

चळवळीचे दिवस—चळवळीच कसले लढाईचेच दिवस! सारी मुंबई सळसळून निघालेली आणि या भागांतच तेवढा शुकशुकाट! मला मोठेंच चमत्कारीक वाटलें. हीच का श्रीमंतांची वस्ती? सहज वरून डोकावून खालीं पाहिलें तर त्या भर मध्यान्ह रात्रीसुद्धां मुंबई जागी असलेली दिसत होती. पण मुंबईचें हें शिखर—मुंबईच्या साऱ्या इभ्रतीला उचलून धरणाऱ्या व्यापारी वर्गाचें हें वसतिस्थान—त्या या मलबार हिलवर मात्र शुकशुकाट! कामसू माणसें तळपत असतांना, श्रीमंत असेच का झोंपून राहातात?

विचाराच्या चक्रांत भ्रमण करीत मी चाललों असतां एक मोटर भर्रकन माझ्यासमोरून निघून गेली.

ती फिरून परत आली नसती तर तशी एकादी मोटार माझ्या समोरून निघून गेल्याची मला जाणीवसुद्धां झाली नसती.

मोटर माझ्या बाजूला येऊन उभी राहिली आणि नंदिनी खालीं उतरली.

"तुम्ही!" ती आश्चर्यचकित होऊन उद्गारली, "तुम्ही यावेळीं इकडे कुठं फिरतां?"

"ही कुणाची मोटार!" मी धीटपणानें विचारलें.

"काँग्रेस हाऊसमधलीच आहे." ती म्हणाली, "येतां का घरीं कीं तुम्हांला घरीं पोंचवूं.?"

"जसा हुकूम होईल तसं!" मी तितक्याच धीमेपणानें विचारलें.

"तर मग चला." असें म्हणत तिनें माझा हात धरून मला गाडींत ओढलें.

बंगल्यावर येतांच मला दिवाणखान्यांत बसवून ती आंत निघून गेली. मी तसाच बसून राहिलों होतों. तिचे कपडे धुळीनें भरलेले होते, तेव्हां अर्थातच साफसुफ करून घ्यायला तिला अवकाश लागला असावा असा विचार करून मी तसाच बसून राहिलों.

भर मध्यान्ह रात्रीं एवढी धूळ माखायला ही गेली होती तरी कुठे? खादीची साडीच ती नेसली होती पण ती केशरी नव्हती. पण त्या साडीवर चढलेल्या तांबड्या धुळीच्या पुटांनी साडीला जवळ जवळ केशरी रंग आला होता. ही तांबडी धूळ कुठली?

उगीच तर्कटें रचण्यापेक्षां ती काय सांगते तें कळेपर्यंत मी स्वस्थ बसून राहिलों.

पण मन मला स्वस्थ बसूं देत नव्हतें. मला वाटलें, हिचें माझें यापूर्वींच लग्न झालें असतें आणि मला कांहींच न विचारतां ही भर मध्यान्ह रात्रीं निघून गेली असती तर मला काय वाटलें असतें? मी तिची सडकून हजेरी घेतली असती का? तिनें उत्तर दिलें नसतें किंवा आम्हां दोघांची तोंडातोंडी झाली असती, भांडण विकोपाला गेलें असतें, तर काय झालें असतें? नवरा या नात्यानें मला काय वाटलें असतें? दुसऱ्या दिवसापासून कॉंग्रेस हाऊसमधें जाण्याची मी तिला बंदी केली असती का? कीं कडक ताकीद देऊन सवलतीच्या अटीवर—वेळीं परत घरीं येण्याच्या अटीवर परवानगी दिली असती? माझ्या अटी तिला पटल्या असत्या का? कीं तिथेंही पुन्हां खटका उडाला असता?—

ती हंसत हंसत माझ्यासमोर येऊन बसली त्यावेळीं माझ्या विचाराची साखळी मधेंच तुटली. "कां आला होतां अशा अपरात्रीं?" तिनें अगदीं लडिवाळपणें विचारलें.

मला आश्चर्य वाटलें. तिकडे कॉंग्रेस हाऊसमधें भेट झाल्यावेळीं तुसडेपणानें बोलणारी नंदिनी आतां अशी लाडांत कां आली? मला झुलवण्यासाठी? बायकांच्या जातीची स्वाभाविक समजली जाणारी ही प्रेमळ लुच्चेगिरी का?

"मन अस्वस्थ झालं," मी म्हटलं. "अगदीं खरं सांगायचं म्हणजे दुपारीं कॉंग्रेस हाऊसमधें तूं माझ्याशीं अगदीं तुटकपणानं वागलीस असं

मला वाटलं. मनांत येईल तें मनांत ठेवायचं नाहीं, अगदीं स्पष्टपणं बोलून दाखवायचं, असं आपलं ठरलं होतं ना ?"

ती अगदीं मोठमोठ्यानें हंसली.

"हंसण्यावारी नेऊं नकोस." मी गंभीर होऊन म्हटलें, "ही हंसण्याजोगी गोष्ट नाहीं. मी अगदीं 'सीरीयस' आहें."

"अगदीं एकाद्या नवऱ्याचाच आव आणला आहांत कीं !" नंदिनी खुर्ची पुढें ओढून घेत म्हणाली. "बरं बरं, मी कबूल करतें, तुमच्या दृष्टीनें माझी चूक झाली—"

"म्हणजे तुझ्या दृष्टीनें नव्हे?—"

"हो, माझ्या दृष्टीनें ती चूक नाहीं खरी पण मी माझा शब्द पाळला नाहीं असं तुम्हाला वाटण्याइतका माझ्याकडून हलगर्जीपणा झाला आहे, यांत मात्र शंका नाहीं—"

"एवढं तरी बरं आहे—एवढं तरी कबूल केलंस; तेवढंच मला समाधान ?"

"अगदीं इतके का रागावलां होतां ?" ती खुर्चीवरून उठून माझ्याशेजारीं बसत म्हणाली.

"आतां असं शेजारीं बसून हा राग घालवायचा प्रयत्न करते आहेस वाटतं ?" असं मी बोलून गेलों खरा पण कुठे तरी चुकलें असें माझें मलाच वाटलें.

एक क्षणभर अगदीं दोघें एकमेकांकडे पहात होतों. त्या नजरेच्या अदलाबदलींत शब्दानें न सांगतां येणारी कितीतरी भाषा बोलून गेल्यासारखें मला वाटलें. ती बोलूं लागली तेव्हां कुठें मी भानावर आलों.

"मीरतच्या खटल्यांत मी तुरुंगांत जायला पाहिजे होतं—ती संधी चुकली याचें मला वाईट वाटलें." ती शून्य मुद्रेनें समोर पहात म्हणाली, "आतां अगदीं उलट वाटतं. एक नवं चैतन्य उत्पन्न झालं आहे. तो कट होता—कट म्हणून समजला जात होता—ती पडद्याआडची कारस्थानं होतीं. आतां उघड लढाई सुरू झाली आहे. तळघरांत बसून काळोखांतले डाग टाकण्यापेक्षां असं उघडया मैदानावर उजळ माथ्यानें झगडणं मोठं 'इंटॉक्सीकेशन' आहे. पहिल्याच दिवशीं मी रंगून गेलें.

भिन्नभिन्न दर्जाचीं लहानमोठीं माणसं—पुरुष बायका, तरुण तरुणी, मुलें म्हातारीं, गरीब श्रीमंत; सारे कसे एका पातळीवर आले आहेत आज. हिंदु-मुसलमान देखील एक झाले आहेत. अस्पृश्यांनींसुद्धां आपला सत्याग्रह बंद ठेवला. जातगोताचं भान विसरून गेलें आहे. पहिल्याच दिवशीं माझ्या हातीं अधिकार आला—"

"कां ?" मी विचारलें, "मोटरी काँग्रेसला दिल्यास म्हणून ?"

"किती कुत्सित बोलतां आहांत !" माझ्याकडे रोखून पहात तिनें म्हटलें, "एकदां या आमच्याबरोबर, आमच्या मेळाव्यांत सामिल व्हा—ड्रीलसाठीं उभे रहा, मिरवणुकींत भाग घ्या आणि मग मला सांगा तुम्हाला काय वाटतें तें—"

"पण तूं गेली होतीस तरी कुठं एवढी तांबडी धूळ माखायला ?"

"केवढा अनर्थ झाला आज ! एक गरीब बिचारा मामलेदार आज प्राणाला मुकला. एक सरकारी नोकर—सत्याग्रही लोकांवर नजर ठेवण्यासाठीं आलेला—पोलीसांनी गोळ्या झाडल्या त्या आम्हां लोकांसाठीं—पण मेला बिचारा मामलेदार. सारा पनवेल गांव हळहळला त्याच्या मृत्यूनें. एका सत्याग्रही मुलीच्या मांडीवर डोकं ठेवून त्यानें प्राण सोडला. विमल गुप्त, जोशी मामलेदाराची कुणी नव्हती, पण शेवटच्या क्षणाला तिचा हात त्याच्या अंगावरून फिरायचा योग होता. अगदीं अवेळीं बातमी आली म्हणून आम्ही धांवत गेलों. साठसत्तर मैलाच्या वेगानें मोटरी हांकल्या—"

क्षणभर ती स्तब्ध राहिली. शून्यावर तिची नजर खिळली होती.

"सत्याग्रही मेला असता तर मला कांहीं वाटलं नसतं; पण सत्याग्रह्याच्या बचावासाठीं एक सरकारी नोकर मेला असतां ही साऱ्या सत्याग्रह्यांनीं अश्रू ढाळले, हें पाहून मला चटका बसला. केवढा भाग्यवान् माणूस ! असं भाग्याचं मरण यायला—असं गोळी लागून मेलेलं माणूस मी पहिल्यानंच पाहिलं—मीच काय, कित्येकांना तरी तो देखावा पहिलाच होता—"

ज्या भावनेनें ती बोलत होती—अंतःकरणांत उत्पन्न होणाऱ्या ऊर्मींच्या खळबळाटांतून प्रवास करीत असतां कंपायमान झालेले जे शब्द—अगदीं थोडकेच शब्द—तिच्या मुखावाटे ओसंडत होते, ते ऐकून

मीसुद्धां सद्‌दीत झालों.

तिच्या डोळ्यांवाटे अश्रूधारा वाहात होत्या, त्या पुसण्याचें भान तिला राहिलें नव्हतें अंतःकरणांतल्या पाझराला ती मोकळी वाट करून देत होती.

" असं झालं एकूण !"

" किती रुक्ष बोलतां आहांत ?" वडिलकीच्या नजरेनें माझ्याकडे पाहात नंदिनी म्हणाली, "तो देखावा पाहायला पाहिजे होता. शत्रुपक्षाच्या वीराच्या मरणानं ढाळलेल्या अश्रुंनीं हा तुमचा सुदांडपणा धुवून गेला असता—" बोलत बोलत ती उठून उभी राहिली.

" उद्यां मी येणारच होतें.—तुम्हीच आलांत ते बरं झालं—पण आतां कांही बोलत नाहीं. मन कसं सुन्न होऊन गेलं आहे. तो देखावा माझ्या नजरेसमोर कसा नाचतो आहे. लढाईचं मैदान मी आज पाहिलं—भाग्याचा दिवस वाटला हा मला! या अफाट भाग्याचा आनंद मला अनुभवूं द्या. जा, उद्यां मी येईन—"

मीही उठून उभा राहिलो. तिनें माझा हात आपल्या हातांत घेतला आणि माझ्या नजरेला नजर दिली.

अजूनही तिच्या डोळ्यांवाटे अश्रू पाझरत होते. तिच्या ओंठावर शब्द पुटपुटत होते, " मायेचं माणूस जवळ असावं असं वाटतं तें अशावेळीं."

एकदम एक मोठा हुंदका देऊन तिनें दोन्ही हात माझ्या गळ्याभोंवतीं टाकले. माझ्या खांद्यावर मान टाकून ती ओक्साबोक्शीं रडूं लागली.

आनंद आणि दुःख या दोहोंचेही परिणाम एकच का ? ती कां रडत होती ?

कांहीतरी बोलून मी तिचें सांत्वन केलें.

चटकन् माझ्यापासून दूर होऊन ती म्हणाली, " जा, एक क्षणभर सुद्धां इथं राहूं नका" ?

जड पावलांनीं मी रस्त्यावर आलों आणि वाट चालूं लागलों.

---



उभ्या रात्रीं इतक्या दूरवर जो मी गेलों त्याचें कांहींच सार्थक झालें नाहीं. तिनें दोन्हीं वचनें पाळलीं नाहींत.

आणि मी तरी काय केलं ? माझ्या वचनाच्या अनुरोधानें मी आपल्या मनाचा तोल संभाळला पाहिजे होता—ती भावनावश झाली त्यावेळीं मी तिचा प्रतिकार केला पाहिजे होता—

भावनेच्या भरांतच तिने या लढ्यांत उडी घेतली याची आतां मला शंका राहिली नाहीं. देशकार्याच्या भावनेनें अंतःकरण उचंबळत असतां माझी तिची गांठ पडली—म्हणूनच का तिच्या मनाचा तोल सुटला ? सार्वत्रिक-व्यापक नजरेंतून एका व्यक्तीकडे पाहातांना माणसाच्या मनाची अशीच का स्थिती होते ? समष्टींतून व्यष्टी शोधून काढायची, कीं व्यष्टीच्या आकर्षणांतून व्यापकता वाढवायची ?

पुनः पुनः माझ्या मनांत येऊं लागलें, आपणसुद्धां या लढ्यांत पडावें.

पण प्रामाणिकपणा टाकून देणें मला शक्य नव्हतें. चळवळ सर्वत्र सुरू होती, हजारों माणसें त्यांत मिसळत होतीं पण मला त्या चळवळी-बद्दल आंतरिक जिव्हाळा नव्हता. अगदीं मनींची खूण सांगायची म्हणजे ती कांहींतरी हुल्लड आहे, असें मला वाटत होतें. एक गेला म्हणून दुसरा जात होता. बुद्धीला पटून जाणारे किती होते ?

तरीही प्रत्येकजण क्लेश सहन करीत होता—तुरुंगांत जात होते—फटके खात होते—रक्त सांडायला देखील तयार होते. हुल्लडसुद्धां इतकी प्रभावी असते काय ? कीं भावनेच्या भरावर उडी टाकल्यानंतर

प्रामाणिकपणाचें बीज आपोआप रुजूं लागतें ?

कबूल केल्याप्रमाणें सकाळीं नंदिनी आली. आतां कालची मनःस्थिती राहिली नव्हती. तो प्रसंग आम्ही दोघेही विसरून गेलों होतों—निदान दोघांनीहीं त्याचा उल्लेख केला नाहीं.

नंदिनी म्हणाली, "मी या भानगडींत कां पडलें तें मलासुद्धां सांगतां यायचं नाहीं. साम्यवादाच्या जोरावर मी हें व्रत पत्करलं नाहीं. साम्यवाद आणि राष्ट्रवाद एका जागीं येऊं शकत नाहींत. या चळवळींत राष्ट्रीयत्वाला अग्रस्थान आहे. साम्यवादाची दृष्टी जागतिक आहे. पण ही जागतिक दृष्टी येण्यापूर्वीं आधीं राष्ट्राची एकी झाली पाहिजे—राष्ट्र स्वतंत्र झालं पाहिजे असं जेव्हां मला वाटूं लागलं, स्वातंत्र्याची आणि ऐक्याची भावना तीव्र व्हायला ही चळवळ उपयोगी पडेल असं जेव्हां मला वाटूं लागलं, त्याचवेळीं मी त्यांत सामील झालें. माझ्या साम्यवादी मित्रांनीं मला सोडलं आहे—या चळवळींत पडायला त्याचा पूर्ण विरोध होता—"

"मग त्यांचं म्हणणं तरी काय?" मी विचारलें, "नुसतीं पुस्तकं वाचून त्यांची चर्चा करायची? नुसतं बडबडत राहायचं? त्यांना करायचं आहे तरी काय?"

"तेंच मी म्हणतें आहें." नंदिनी अस्वस्थपणानें म्हणाली, "एकजूट पाहिजे. समुदाय एकत्र झाला पाहिजे आणि इथं तर समुदाय एकत्र झाला आहे. मी म्हटलं, कां या संधीचा फायदा घेऊं नये? पुष्कळ विचार केला मी या विषयावर—कांहीं अगदींच अविचारानं उडी घेतली नाहीं—"

ती उठून उभी राहून येरझाऱ्या घालूं लागली. "माझा फार भरंवसा होता या मित्रांवर पण मला त्यांचा बुद्धिवाद पटला नाहीं. या चळवळीचा फायदा घेऊन सरकारवर वजन पाडलं तर आमचे मीरतचे मीत्रसुद्धां सुटतील असं मला वाटतं—पण त्यांना वाटत नाहीं—"

ती पुन्हां बसली. तिच्या अंतःकरणांत भयंकर खळबळ चालत असावी असें तिच्या मुद्रेवरून दिसत होतें. केवढा हा हिंदुस्थानचा पसारा! केवढं जगाचं राजकारण!—पण त्याचा भार माथीं वाहून एक लहानशी मुलगी, एका लहानशा जागीं बसून, आपल्या चिमुकल्या डोक्याला केवढा

मोठा ताण देते आहे ?

मला कौतुक वाटलें—अभिमान वाटला. नंदिनीच्या या आत्यंतिक जिव्हाळ्यामुळें माझ्या भावनाशून्यतेची मला लाज वाटूं लागली.

शून्य दृष्टीनें पहात ती बोलूं लागली, "आज ना उद्यां मला तुरुंगांत जावं लागणार ! तुरुंगांत जायला मी भीत नाहीं. पण मी तुरुंगांत-गेल्यानें —माझ्यासारखीं अशीं बरीचशीं माणसं अशी तुरुंगांत गेल्यानें स्वातंत्र्याच्या मार्गावर एक पाऊल पुढं पडेल काय ?"

"आतां त्याचा विचारच करीत बसूं नकोस." मी तिला धीर देत म्हटलें, "जें व्रत पत्करलं आहेस त्याचं उद्यापन झालं पाहिजे. तुरुंगवास हेंच त्याचें उद्यापन ! राजकारणासाठीं एकादा माणूस तुरुंगांत गेला तर केवढं त्याचं कौतुक होत होतं! केवढे त्याचे देव्हारे माजवले जात होते! आज रोज शेंकडो माणसं तुरुंगांत जाताहेत त्यांचं कौतुक करून तरी किती करायचं! या तुरुंगांत जाण्याच्या कौतुकानं भलत्या माणसांना भलतं महत्व येत होतं. आतां तें चोज रहणार नाहीं—हा थोडा का फायदा आहे ?"

"येवढाच धीराचा एक शब्द मला पाहिजे होता!" नंदिनी एक सुस्कारा सोडून म्हणाली, "सारेच विरोध करतात म्हणून माझं मन साशंक होत होतं. या धीराच्या शब्दांनीं मलाही धीर आला. या लढ्यावर तुमचा विश्वास नाहीं तरीही तुम्हीं मला विरोध केला नाहीं. का?"

"माझ्या प्रामाणिकपणासाठीं मला तुझा बळी घ्यायचा नाहीं म्हणून! ज्याची त्याची मतं ज्याला त्याला आवडतीं असतात. कुणी कुणावर कां सक्ती करावी विरोध करून कांहींच होत नाहीं. भावना प्रबल झाली, कीं उपदेश लंगडा पडतो. अनुभवाचा फटका खायची मोकळीक कुणी कुणाला कां देऊं नये ?"

"म्हणजे ? इथं मला फटका बसणार असं का तुम्हाला वाटतं ?"

"तें मी कसं सांगूं ? अनुभवाचा फटका खाणं म्हणजे कांहीं अपजय मिळणं नव्हे. यश असो किंवा अपयश असो, ते उसनं असून चालत नाहीं. प्रत्यक्ष अनुभव घेतला पाहिजे—"

मी बोलत होतों, तसतशी तिची मुद्रा पालटत होती. प्रत्येक

शब्दाला तिची कळी खुलत होती. चटकन् उठून माझ्या खांद्यावर दोन्ही हात ठेऊन ती म्हणाली, "असं वाटतं—प्रामाणिक माणसं जगांत फार थोडीं असतात—असं विरळा असलेलं प्रामाणिक माणूस दिसलं, कीं असं वाटतं त्याला धरून खाऊन गिळून टाकावं!"

माझें हंसू मला आवरतां येईना. मी हसूं लागलों, तीही हसूं लागली. हंसत हंसत माझ्या शेजारीं ती कोचावर बसली.

परकेपणाचा आडपडदा अगदीं दूर झाला होता.

ती म्हणाली, "एक कल्पना आली आहे माझ्या मनांत. आजपासून मी सेक्रेटरी झालें आहें वॉर कौन्सिलची. चारदोन दिवसांत मला तुरुंगांत जावं लागणार. त्यापूर्वी—" लाजल्यासारखे करून ती एकदम स्तब्ध राहिली.

"त्यापूर्वी काय ?" मी उत्सुकतेनें विचारलें.

"त्यापूर्वी आपण लग्न करूं !" ती गंभीरपणें म्हणाली.

मी हतबुद्ध झालों. काय ही वेडी लहर आली हिच्या मनांत !

"बोलत कां नाहीं ?" ती माझा हात धरून म्हणाली, "पटत नाहीं ?"

प्रश्न अगदींच अनपेक्षित होता—निदान यावेळीं तरी असा कांहीं प्रश्न येईल असें मला वाटलें नव्हतें. म्हणून मी म्हटलें, "इतकी घाई करायचं काय कारण ? तुरुंगांत जावं लागणार म्हणून का लग्न करायचं? अजूनपर्यंत मी लग्नाबद्दल फारसा विचार केला नाहीं बंधनाची मला आवड नाहीं. मला स्वतःला बंधन नको आणि दुसऱ्याला बंधन घालणं मला ही पटत नाहीं— हं थांब, या बाबतींत माझं ठाम मत आहे, कीं लग्न म्हणजे बंधन आहे—"

"तर मग आपण प्रयोग करून पाहूं !" ती मोठ्या उत्साहानें म्हणाली, "लग्न म्हणजे बंधनं यांत शंका नाहीं. पण लग्न करूनही बंधनाची कल्पना टाळतां येते कीं काय, याचा आपण प्रयोग करून पाहूं—"

अगदीं अर्ध्याच उद्गारावर माझ्या चेहऱ्याकडे पहात ती तशीच बसून राहिली. अजून माझा हात तिच्या हातांत होता पण माझें चित भ्रमण करीत होतें. तिची आत्यंतिकता पाहून अविचारानें कांहींतरी उत्तर

देणें मला योग्य वाटेना.

"काय ? झाला मनाचा निश्चय ?" ती म्हणाली.

"निश्चय करण्याइतका अवकाश आहे कुठं ? गेल्या कित्येक दिव-सांत तुझी माझी गांठसुद्धां नाहीं. त्या मुदतींत कदाचित् ही कल्पना तुझ्या डोक्यांत आली असेल — त्या बाबतींत तूं बराचसा विचारही केला अस-शील. पण तूं चटकन सांगावं आणि मी पटकन् होय म्हणावं इतकी भावनात्मकता माझ्या ठिकाणीं नाहीं. अति विचाराची मला फार वाईट खोड आहे. मला वाटतं, अजून कांहीं दिवस थांबावं. लवकरच तुला तुरुंगांत जावं लागणार आहे—आणि तें अगदीं निश्चित आहे. त्या मुद-तींत चांगला विचार करून पहा. आणि मग बाहेर आल्यावर —"

"बरं आहे, मी थांबतें." ती म्हणाली, "पण तुरुंगांतून येईपर्यंत नाहीं- एक आठवडाभर जर मी तुरुंगांत गेलें नाहीं तर तेवढी मुदत देतें मी तुला विचार करायला! गेलेंच तर इलाज नाहीं. काय कबूल ?"

तरीही माझ्या मनाचा निश्चय होईना. एकदा होय म्हटलें कीं माघार घ्यायची नाहीं—आणि कुणी सांगावें, कदाचित् आठवडाभरानेंही ती तुरुंगांत गेली असती! हीं वॉर कौन्सीलें केव्हां पकडलीं जातील यांचा कांहींच नेम नसे. कुणी नेमल्यापासून एकदोन दिवसांत गेले होते, तर केव्हां केव्हां तीनचार आठवडे सुद्धां उलटले होते. म्हणून मी म्हटलें, "याच उत्तर सुद्धां मी तुला उद्यां सांगेन. माझं मन मला पारखून पाहिलं पाहिजे. चौदा दिवसांच्या नोटिसीशिवाय लग्न राजिस्टर होत नाहीं आणि हिंदु मॅरेज म्हणजे कायमचें बंधन—मला नव्हे, तुला—म्हणून मला विचार केला पाहिजे."

"ठीक आहे. उद्यां सांग." असें म्हणून ती उगी राहिली.

माझ्या अंतःकरणाची खळबळ उडाली. तारुण्यसुलभ भावना उसळूं पाहात होत्या पण मी त्यांना आळा घातला होता. कोणताही अविचार करायचा नाहीं, तिच्या मनांत आलेल्या अनपेक्षित कल्पनेला आपल्या अनियंत्रित उत्साहानें उत्तेजन द्यायचें नाहीं, असें ठरवून आत्म-संयमन करणें त्या प्रसंगीं मला फार कठीण गेलें.

नंतर बराच वेळ आम्ही बोलत राहिलों. कॉंग्रेस हाऊसमध्यें

होणाऱ्या चळवळीचा तो इतिहास होता. हिंदुस्तानी सेवादलांत स्त्रियांची तुकडी नवीनच सुरू केली होती. स्त्रिया कशी कवाईत करतात तें पहाण्यासाठीं तिनें मला बोलावलें.

खरोखरच तें दृश्य अगदीं नावीन्यपूर्ण होतें. केशरी साडी आणि निळा कोट घालून संघ-व्यायाम-पद्धतीनें स्त्रिया कवाईत करीत होत्या. पंधरा सोळा वर्षांच्या मुलीपासून तीस पस्तीस वयापर्यंतच्या स्त्रिया या कवायतींत भाग घेत होत्या.

मला प्रश्न पडला, हें दृश्य अपूर्व आहे खरें पण लोभनीय आहे का? स्वाभाविक मार्दवाची भावना टाकून मर्दानी खेळांत स्त्रियांनीं सामील व्हावें हें योग्य आहे का? उद्यां खरोखरच एकादी लढाई सुरू झाली तर खांद्यावर बंदूक टाकून स्त्रिया लढाईवर जातील का? आणि गेल्याच तर पुरुषांच्या तोडीची मर्दुमकी दाखवणें त्यांना शक्य आहे का?

आज स्त्रिया मर्दुमकी दाखवीत होत्या—पण त्या अनत्याचारी चळवळींत! तोफा आणि मशिनगन्सच्या गडगडाटांत त्यांची ही मर्दुमकी टिकेल का?

हा प्रश्न अवास्तव होता असें मला वाटलें. तोफा आणि मशिनगन्सच्या गडगडाटांत हिंदुस्तानचे पांढरपेशे पुरुष तरीं मर्दुमकी दाखवायला कितीसे समर्थ होतील! साध्या कवायतीची संवय तरी कितीशा पुरुषांना होती. लढाईच्या वेषांत पंचवीस तीस मैलांची मजल मारण्याची ताकद असलेले कितीसे पुरुष आज सांपडतील!

जी स्थिती पुरुषांची ती स्त्रियांची! दोन्हीं माणसें दुबळीं झालेलीं! दोघांनींही परिश्रम केले, मनाची तयारी केली—देहाची कसरत केली तर दोघेही कां नाहीं तयार होणार?

दुसऱ्या बाजूला पुरुषांची कवाईत सुरू होती. पण शिस्तीच्या दृष्टीनें सेवादलांतल्या स्त्रिया मला जास्त व्यवस्थित वाटल्या. म्हणजे पुरुष अव्यवस्थित होते असें नव्हे, पण त्यांच्या कवायतींत रेखीवपणा कमी होता.

कवाईत संपतांच माझ्याकडे येऊन नंदिनी म्हणाली,
“ कसं काय वाटलं? ”

“ दृश्य मोठं लोभनीय आहे खरं, पण यांतून निष्पन्न काय होणार?

उद्यां खरीखुरी लढाई झाली तर तुम्ही बायका आघाडीवर कां जाणार आहांत ?"

" ही नव्हे वाटते खरी लढाई?"

" मला शंका आहे. लढाई असेल पण ती एकदेशी आहे. दोन्ही बाजूच्या माऱ्यांत तुम्ही बायका किती टिकाल याची मला अजून शंका आहे."

" आणि तुम्ही पुरुष ?"

" तीही शंका आहेच— म्हणूनच मी मोठा गोंधळून गेलों आहे."

" रशियांत घडलं तें इथं कां घडूं नये ! तिथं नाहीं का बायका रणांगणावर लढल्या?"

" घोडा मैदान जवळ येईल त्यावेळीं पहा !" मी हंसत हंसत म्हटलें.

" पाहूं बरं, पाहूं !" असें म्हणून माझ्या पाठीवर थाप मारून ती निघून गेली.



# ९

तीनचार दिवस निघून गेले पण पकडापकडी कांहीं झाली नाहीं. मी बहुतेक दररोज काँग्रेस हाऊसकडे खेप टाकीत असें पण नंदिनीची दृष्टभेट होण्यापलीकडे मला फारसें बोलतां येत नसे. कितीतरी माणसांचा तिच्याभोंवतीं नेहमीं गराडा पडलेला असे आणि एकाद्या ऑफिसरप्रमाणें एकेकाला हुकूम करीत ती कामांची विल्हेवाट लावीत असलेली पाहातांना माझें हृदय अभिमानानें फुलून निघे.

त्या दिवशी एक चमत्कार झाला. सेवादलाच्या पोषाखांत असलेला सुरेंद्र मला भेटला.

कितीतरी दिवसांनीं त्याची ही भेट झाली. नंदिनीकडे येण्याचें त्यानें कां बंद केलें होतें, याचें मला कुतूहल होतें.

आपणहून तो त्या विषयाचा उल्लेख करीत नाहीं असें पाहून मला आश्चर्य वाटलें. विचारावें असें मला वाटत होतें, पण मन घेईना.

निरनिराळ्या मतांचीं माणसें या मेळाव्यांत सामील झालीं होतीं तसाच तोही आला होता. पहिल्यापासूनच त्याचा गांधींच्या तत्त्वाकडे बराच ओढा होता — असत्याचारावर विश्वास होता. — तो म्हणाला, " हा प्रयोग कसा यशस्वी होतो हें पाहाण्यासाठीं मी आलों आहें. कितीतरी लोक इथं गोळा झाले आहेत. पण या कायदेभंगाची उभारणी कोणत्या तत्वावर केली आहे याची फारच थोड्यांना जाणीव आहे. शक्य तेवढें करून तुरुंगांत न जाण्याचा मी निश्चय केला आहे. मी अशाच कामांत भाग घेतों, की त्यामुळें तो प्रसंग माझ्यावर येऊं नये. मला तुरुंगाची भिती

वाटत नाहीं. पण माझा उद्देश काय आहे तें एव्हां मला सांगायचं नाहीं—"

"नंदिनी भेटली का तुम्हाला" मी विचारलें

'हो" तो गंभीर होऊन म्हणाला, "नुसती भेट झाली. पण सध्यां ती फार गडबडींत असते. तसं बोलायला कांहीं मिळालं नाहीं. या भानगडींत ती कशी पडली याचंच मला आश्चर्य वाटतं—पण तुम्ही तर अजून खादी चढवेल्ली दिसत नाहीं."

"तें माझं काम नाहीं" मी म्हटलें, "मी आपला एक तटस्थ प्रेक्षक आहें. काय गमती चालताहेत त्या नुसत्या पाहातोंय्."

"पण नंदिनीला हें पटतं का?"

"तिच्या पटण्याचा काय संबंध? माझा मी मुखत्यार आहें. तिच्या फुंकरीनं हालून जाण्याइतका मी कांहीं हलका नाहीं. ती इथं आली तें तरी तिनं मला कुठं सांगितलं होतं?"

"मोठं आश्चर्य आहे!" सुरेंद्र आपल्याशींच पुटपुटला. त्याची मुद्रा बदलली होती. भुंवया संकुचित झाल्या होत्या. अगदीं तीक्ष्ण नजरेनें रोखून तो माझ्याकडे पाहात होता.

त्याच्या त्या भेदक दृष्टीचा माझ्यावर परिणाम झाला खरा पण तो त्याला न दिसूं देण्याइतकी खबरदारी मी घेत होतों.

तो पुढें म्हणाला "मला वाटलं तुम्हीं दोघंही शिरलां असाल या चळवळींत!"

"असं कां वाटावं तुम्हाला.? तुमच्याखेरीज आणखीही कित्येकजण येत होते ते कुठं शिरले आहेत या चळवळींत?"

सुरेंद्र माझ्याकडे नुसता पाहात राहिला. तेव्हां मी त्याला विचारलें, "आम्ही दोघंच येऊं असं कां वाटलं तुम्हाला?"

माझ्याकडची नजर वर कॉंग्रेस ऑफीसकडे वळवून ग्यालरींत कुणाशीं बोलत उभी राहिलेल्या नंदिनीकडे पहात तो म्हणाला, "तें मला सांगतां येत नाहीं—पण नंदिनी इथं आलेली पाहिली तेव्हां मला वाटलं, कीं तुम्हीही इथंच असणार. एकूण माझा अंदाज चुकला तर?" असें बोलून तो चट्कन् निघून गेला.

सुरेंद्राच्या गैरहजेरीमागें कांहींतरी रहस्य आहे असा जो मला संशय होता तो त्याच्या या भाषणानें जास्तच बळावला. इतरांपेक्षा जास्त चौकसपणें तो आम्हां दोघांकडे त्यावेळीं पाहात असावा असें आतां मला वाटूं लागलें. नंदिनीची माझ्याशीं असलेली आपुलकीची वागणूक सुरेंद्राला दिसून आली असावी आणि म्हणूनच त्यानें तसे उद्गार काढले.

तो दिवस चमत्काराचा होता. घरीं येतों तों तिथें एक पाहुणी आली होती, माझ्या संसारांत ही अगदीं अपूर्वाई होती.

तिला मी पूर्वी कधींच पाहिलें नव्हतें. कुठले तरी नात्याचे धागेदोरे जोडून ती आली होती. येतांना तिनें आपल्या बापाकडून मला उद्देशून लिहीलेलें एक पत्र आणलें होतें.

माझ्या वडिलांच्या तोंडून मी तिच्या बापाचें नांव ऐकलें होतें खरें पण ती आठवण फार अंधुक होती तिचे वडील जसे आमच्या नात्याचे होते तसेच माझ्या वडिलांचे सहाध्यायी होते—लहानपणचे लंगोटीयार मित्र होते. पुढल्या आयुष्यांत देखील त्यांनीं एका जागीं बरेच दिवस काढले होते. लहानपणीं कदाचित् मी त्यांना पाहिलेंही असेल.

ती एक चुणचुणीत मुलगी होती. सायन्स कॉलेजमध्ये जाण्यासाठीं आली होती.

तिच्या बोलण्यावरून वाटलें, कीं माझ्या घरीच ठाण मांडून राहाण्याचा तिचा विचार झाला आहे.

मला प्रश्न पडला, हें कसे जमेल ! माझ्या घरीं स्वयंपाकी नाहीं. दुसरें कुणी माणूस नाहीं.

ती म्हणाली, "त्याची काळजी नको. तुम्ही एखादा सैंपाकी पहा म्हणजे झालं. सैंपाकावर मी देखरेख करीन. कुठंतरी बोर्डींगांत राहाणं बाबानां पसंत नाहीं."

मी चिडून म्हटलें "आणि माझ्यासारख्या तरण्याताठ्या एकलकोंड्या माणसाकडे राहाणं तुझ्या बाबानां आहे का पसंत ?"

ती मोठमोठ्यानें हसूं लागली. मी अगदीं खवळून गेलों होतों. बखोटीला धरून तिला बाहेर काढून लावावी आणि तिचें सामान बाहेर फेंकून द्यावें असेंसुद्धां माझ्या मनांत आलें.

पण ती मोठी खंबीर होती तशीच मोठी चाणाक्षही होती.

"काय वाटलं तुम्हांला?" ती हंसत म्हणाली, "अगदीं मला बाहेर काढून लावावं असं वाटलं नाहीं? तें आतां शक्य नाहीं. मी इथं आलें आहें,—मी इथंच राहाणार आहें—तुम्ही नको म्हटलंत तरीसुद्धां राहाणार आहे. तुम्हांला तरी कोण आहे इथं? असे वेताळासारखे एकटेच राहातां हें शोभतं का तुम्हांला? तें कांहीं नाहीं—एक शब्दसुद्धां बोलूं द्यायची नाहीं! राहाणार म्हणजे राहाणार and that's that"

मी थक्क झालों. अशी मुलगी मी कधीं पाहिली नव्हती. तिचा तो धट्टपणा पाहून थोडेसें कौतुकच वाटलें.

"पण तूं कोण आहेस म्हणून मी सांगायचं लोकांना?" मी भीत-भीत विचारलें.

"सांगा तुमची सासू म्हणून!"

"पण लग्न कुठं झालं आहे माझं?"

"नाहीं झालं? तर पाहीन इथली एकादी मुलगी आणि देईन तुमचें लग्न लावून—अन् लग्नापूर्वी घेईन तिला दत्तक!"

"तुझं लग्न झालं आहे का?"

"माझं लग्न होय?" असें बोलून ती मोठमोठ्यानें हंसत सुटली, "माझ्याशीं लग्न करणारा अजून जन्माला यायचा आहे—लग्नाचं मागाहून पाहूं पण आधी जेवणाची व्यवस्था करा कांहीतरीं, सैंपाकी मिळेपर्यंत सध्यां आपण डबेच मागवूं—"

इकडे तिकडे पाहून ती म्हणाली, "मला कपडे बदलायचे आहेत. जरा धुऊन पुसून घ्यायचं आहे, नळ कुठं आहे? टुवाल बिवाल आहे कीं नाहीं एकादा घरांत?—"

माझ्या उत्तराची वाट न पाहातां तिनें आपली ट्रंक उघडली, भराभर कपडे काढले आणि आंतल्या खोलींत जाऊन धाडकन् दार लावून घेतलें.

मी सुन्न होऊन स्वस्थ बसलों. मला वाटलें, ही भलती आफत आली. बुद्धीवादाच्या पलीकडे गेलेल्या या अवखळ मुलीला मला कसें आवरतां येईल? कसा माझा निभाव लागणार?

आंत नळावर तोंड धुतांना ती गाण्याच्या लकेऱ्या मारीत होती.

मी घाबरून गेलों—रोज जर अशी ही गात बसली तर शेजारीपाजारी काय म्हणतील ?

मी अगदीं बेचैन होऊन गेलों.

बरेचसे दिवस घेऊन गडी बाहेरून आला. तिनेंच त्याला खरेदीला पाठविलें होतें वाटतें !

दरवाजा उघडून ती बाहेर आली. तिला पाहातांच मी दिपून गेलों. चांगले नीटनेटके केंस विंचरून, तोंडाला पावडर माखून झुळझुळीतशी साडी नेसून जेव्हां ती बाहेर आली तेव्हां मला तें एक चालतें बोलतें चित्र वाटलें.

तशी कांहीं ती सुंदर नव्हती. पण कुणीही तरुण तिच्याकडे टक लावून पाहात राहिला असता. ती वाटोळें नेसली होती. विकच्छ नेसण्याचा प्रचार मुंबईंत त्यावेळीं सुरू झाला नव्हता. त्यामुळें तिची ती नेसण्याची पद्धत पाहून मला जरा चमत्कारिक वाटलें. समोर बसत ती म्हणाली, " पांडोबा नव्हे का तुमचं नांव ? पाडुंरंगपंत !—मी पंत म्हणत जाईन तुम्हाला, तें दादा, बाबा, काका मला आवडत नाहीं. लोक काय म्हणतात तुम्हाला ?"

" पांडोबाच म्हणतात मला सर्व लोक. नि असं म्हणणारे म्हणजे या गल्लींतलेच !"

" तसं कोणी येत जात नाहीं वाटतं इथं ? कुणी दोस्त, कुणी नातेवाईक, कुणी वर्गबंधु !"

"कुणीसुद्धां नाहीं!" असें मी म्हणून गेलों खरा पण लगेच चपापलों.

" कां दचकलांतसे ?" ती चटकन् म्हणाली, " खोटं बोललांत वाटतं ? कुणी येतं वाटतं इथं ? पुरुष कीं स्त्री ?–एकादी कॉलेज भगिनी ?"

" नाहीं, कुणी नाहीं. कॉलेजांत नव्हतोंच मी फारसा. तेव्हां कोणाच्याच ओळखी झाल्या नाहींत "

" मग दचकलांत कां ?"

मोठी पंचाईत आली. काय उत्तर देऊं या खाष्ट पोरीला.? ओळख नाहीं देख नाहीं आणि पहिल्याच भेटीला कोण हा भडीमार !

मी जरा वडीलपणाचा आव आणून म्हटलें, "आतां जरा स्वस्थ रहा आणि काय आणवलं आहेस तें खाऊन टाक. गडी देईल चहा करून आणि आणील डबे."

"कोको नाहीं वाटतं -- कॉफी तरी! नाहीतर एक ओव्हलटीनचा डबाच आणवतें!" असें म्हणून ती उठली आणि टेबलावर पडलेली आपली छोटी बॅग उघडूं लागली.

मी गड्याला बोलावून ओव्हलटीन आणायला सांगितलें. 'ठीक आहे' असें म्हणून तिनें बॅग बंद करून फेंकून दिली.

धांवतच ती आंत गेली आणि कांहीं बशा घेऊन आली. भराभर पुड्या उघडून एकएक बशी भरून माझ्यापुढें ठेवीत ती म्हणाली, "हं, करा सुरू. मला जरा हातभार लावा. एवढं सगळं खपायचं नाहीं मला."

"जेवणापूर्वी मी कांहीं नाहीं खात." मी जरा रागावूनच म्हटलें.

"ठीक आहे. नका खाऊं. राहीलं तर गडी खाईल. तुम्ही मुंबईचे लोकच मुळीं 'डिसपेप्टीक!' चांगलं सडकून खवं. खाल्ल्या-प्याल्याशिवाय कसे हातपाय हालवित माणसाचे?" ती खात खात बोलत होती, "बाबांना कांहीं अंदाज नव्हता. अगदीं लहानपणीं त्यांनीं तुम्हांला पाहिलं होतं. पण चान्स घ्यायचा ठरवलं. एकंदरींत बरा दिसतो तुमचा स्वभाव. तसे कांहीं अगदीं हे दिसत नाहीं तुम्ही. नोकरीबिकरी करतां वाटतं एकादी? — नाहीं?—तेंही खरंच! कशाला हवी आहे नोकरी? बाबा म्हणत होते, चांगली पुंजी करून ठेविली आहे तुमच्या वडिलांनी!— घाबरूं नका. तुमच्या पुंजीवर डोळा ठेऊन नाहीं आलें मी. माझेही बाबा चांगले गब्बर आहेत. तुमचासुद्धां खर्च मी चालवीन!—"

पलीकडल्या रस्त्यावरून मोठमोठ्यानें जयजयकार करीत कसली तरी मिरवणूक चालली होती. दोनतीन भजीं हातांत घेऊन तोंडांत कोंबीत ती धांवत धांवत जिना उतरून गेली.

परत आली ती बोलतच आली, 'मोठी दंगल उडाली आहे तुमच्या मुंबईत. रोज वाचीत होतें वर्तमानपत्रांतून. आतां प्रत्यक्ष पाहायला मिळेल—" तिची बडबड सारखी सुरू होती. आपल्या घरच्या गोष्टी ती सांगत होती. बोलत बोलतच तिनें स्टोव्ह पेटवला, ओव्हलटीन तयार

केलें, दोन कप भरले आणि एक कप माझ्यापुढें करून ती म्हणाली, "घ्या हें ! कांहीं मरायला नाहीं व्हायचं एवढं ओव्हलटीन घेतलं तर ! भूक मेली तर घांसभर कमी जेवा !"

मी मुकाट्यानें कप घेऊन पिऊं लागलों.

त्या रात्रीं मला चांगलीशी झोंप आली नाहीं.



# १०

सकाळींच उठून पाहातों तो मधूनें घराचा ताबा घेतला होता.

तिचें नांव मधुरिका होतें कीं मधुमालती होतें, हें तिलाच सांगतां येत नव्हतें. ती म्हणाली, " सारीं मधू म्हणतात मला. आणि शाळा कॉलेजांतून नुसतं मधूच नांव लावलं आहे माझं. मधुरिका असो, कीं मधुमालती असो, माझं नांव मधुकरही नव्हे आणि मधुसुदनही नव्हे !"

आपल्याच विनोदाला ती आपणच हंसत सुटली. हंसण्याशिवाय तिला जगतांच येत नव्हतें काय ?

तिनें गड्याला केव्हां सांगितलें आणि कुठून स्वयंपाकी आणवला हें कांहीं मला कळलें नाहीं. पोटमाळ्यावर पेटींत सैंपाकाची भांडीं होतीं त्यांचा पत्ता तिला कसा लागला कोण जाणे. मी उठून पाहातों तो सारे धामधूम सुरू होती. गडी आणि सैंपाकी यांच्या जोडीला एक मोलकरीणही आली होती आणि भांड्यांची घासपूस सुरू होती.

मला पाहांताच ती गड्याला ओरडली, " अरे चहा दिला नाहींस शेटनां ?"

मुंबईंत गडी धन्याला 'शेट' म्हणतात, हेंसुद्धां तिला इतक्यांत कळलं अं ?

सकाळचीं नित्य कर्मे उरकून मी माझ्या टेबलाजवळ बसलों होतों. पुस्तक हातीं घेतलें पण वाचण्याकडे लक्ष लागेना. वर्तमानपत्रें आधींच चाळून झालीं होतीं. पुस्तक समोर टेऊन, मी छताकडे डोळे लावून आल्या परिस्थितीचा विचार करीत बसलों असतां, नंदिनी केव्हां आली तें मला

कळलें नाहीं.

तिनें हटकतांच मी दचकलों. ती म्हणाली, "बहुधा आज मला पकडणार. पकडण्यापूर्वी द्यायचा संदेश मी लिहून आणला आहे— हा पाहा."

मी तो कागद हातीं घेऊन पाहूं लागलों. वाचलें तरी मला कांहीं कळेना—इतकें माझें डोकें भिरभिरून गेलें होतें. अक्षरें डोळ्यापुढें नाचूं लागलीं.

आंत पूर्वीसारखीच मोरे गडबड सुरू होती. तिकडे नंदिनीचें लक्ष गेलें.

"काय गडबड आहे आज तुमच्या घरांत?" तिनें विचारलें.

मी उत्तर देणार तोंच मधू बाहेर आली आणि म्हणाली, "झालं, लागलं एकदाचं सैपाकघर—" नंदिनीला पाहातांच ती दचकून थांबली आणि नखशिखांत तिच्याकडे पाहात उद्गारली, "हा कोण पासोड्या मारुती, तात्या?"

मला वाटलें नंदिनी चिडणार—पण नाहीं—ती हंसली आणि म्हणाली. "पण आधीं सांग, तूं कोण आहेस? कुठून आलीस? कशी आलीस? कां आलीस?"

"छान्! छान्!" मधू उद्गारली, "सूत म्हणतात शौनकादिक हो, बरा प्रश्न केलात्! ऐका—" आणि विशेष प्रश्नाची वाट न पाहातां तिनें आपल्या हकीकतीचा पाढा वाचायला सुरवात केली.

मधूची टकळी सारखी सुरू होती. कुणालाच बोलायला ती अवसर देत नव्हती. मी निर्विकार मनानें ऐकत होतों. नंदिनी ऐकत असतांना गोड गोड हंसत होती.

"झालं माझं आत्मपुराण!" असें म्हणून मधू उठून नंदिनीच्या खुर्चीच्या हातावर बसून म्हणाली, "आतां होऊं द्या तुमचं पुराण सुरू!"

तिच्या पाठीवरून हात फिरवीत नंदिनी म्हणाली, "माझं पुराण सांगायला आतां वेळ नाहीं. तुझ्या तात्यांना—तात्याच म्हणतेस ना यांना?—यांना सावकाश विचार. मला घाई आहे, आज तुरुंगांत जायचं आहे मला—"

"तुरुंगांत?" ताड्कन् उठून मधू म्हणाली, "केव्हां पकडणार

आहेत ? आतांच का ? कुठं पकडणार ? मी येऊं का बरोबर? मला पाहायची आहे ही पकडापकडी. लाठीमार होणार आहे का ? तुमच्यावर देखील लाठीमार होणार आहे का ?"

" अग हो, हो !" नंदिनी हसत म्हणाली, " कुणाला कसं नी केव्हां पकडतील तें कांही सांगतां यायचं नाहीं. चोवीस तास माझ्याबरोबर राहावं लागेल, तेव्हां कळेल कसं पकडतात ते "!

" अन् मग ही जेवणाची व्यवस्था कोण पाहील ? आजपासून डबा बंद. सैंपाकी आला. आज इथंच व्हायचं जेवण तयार. पहा कसा संसार थाटलाय ?"

' संसार थाटला आहे ?' नंदिनी आपल्याशींच पुटपुटली.

"आतां मला वेळ नाहीं " नंदिनी उभी राहून म्हणाली, " आतां मला गेलं पाहिजे कांग्रेस हाऊसमधें. मोकळी असलें तर येईन संध्याकाळीं. नाहींतर तुरुंगांतून परत आल्यावर !" माझ्याकडे वळून ती म्हणाली, " ठीक आहे ना संदेश."

" कसला संदेश ?" मधु तिच्या हातून कागद हिसकावून घेत म्हणाली.

तिनें वाचायला सुरवात केली, "भगिनींनों, आणीबाणीचा काल आला आहे. देहदंडाचा काल आला आहे. संसाराचा मोह सोडा,— आप्त स्वकीयांची बंधनें तोडा आणि या अनत्याचारी लढाईच्या मैदानावर उडी घ्या. भारतमातेच्या स्वातंत्र्यासाठीं आज जर कुणी पुढें सरसावणें अवश्य असेल, तर ते आम्ही महिलांनीच. आम्ही निर्भय आहोत, कर्तबगार आहोंत, स्वार्थत्यागाच्या कामी आम्हीं कुणालाही हार जाणार नाहीं हें साऱ्या जगानें पाहिलें आहे. रणांगणावर एक शिपाई पडला तर दुसरा उभा राहातो. पण या अनत्याचारी संग्रामांत एक शिपाई पडला तर शभर उभे राहिले पाहिजेत. भगिनींनों, माझी हाक तुमच्या कानीं पोंचणार ना ?"

मधू अशा थाटांत वाचीत होती, कीं तें ऐकायला गडी आणि सैंपाकीदेखील येऊन दारांत उभे राहिले.

नंदिनी ओशाळल्यासारखी झाली. मधूच्या हातून कागद ओढून घेत ती म्हणाली, " हें सारं औपचारीक आहे—नुसतं ' रिच्युअल ' आहे "

"मोठं स्फूर्तिजनक आहे!" मधू उद्गारली. नंदिनीचा चहरा प्रफुल्लीत झाला. "येतें बरं!" असें म्हणून नमस्कार करून नंदिनी झट्कन निघून गेली. मधू धांवत धांवत तिच्या मागाहून जिना उतरून निघून गेली. मला भिती पडली, ही परत येते कीं जाते तिच्याबरोबर!

पण नाहीं—मधू परत आली.

"मोठी छान आहे. ही तुमची नंदिनी बरं का तात्या," मधू खिड-कींतून पाहात म्हणाली "किती व्हालंटीअर्स होते तिच्याबरोबर! केवढा जयजयकार केला त्यांनीं तिचा! राजालासुद्धां मिळायचा नाहीं असा मान!"

"मग?" मी खंवचटपणें म्हटलें, "तूंही जाणार आहेस का तशीच?"

"तें आपल्याला नाहीं साधायचं बुवा! पाहायला बरं हें. तुरुं-गांत जायची कल्पनाच मोठी भयंकर वाटते. अन् या पासोड्या नेसाव्या लागतील ना? तें तुरुंगाहूनही भयंकर! छेः नाहीं ग बाई!" असें म्हणून ती आंत निघून गेली.

मी बावरल्यासारखा झालों होतों. माझ्या एकलकोंड्या संसारांत झालेला हा पालट मला चांगलाच जाणवत होता.

नंदिनी आली तेव्हा मी घाबरलों होतों. कालचा प्रश्न विचारला तर त्याचें उत्तर मला देतां आलें नसतें. विचार करायला मला अवकाशच मिळाला नव्हता—म्हणजे निश्चित उत्तर द्यायला नव्हे—कांहींतरी उत्तर द्यायला! एवढा तरी मधूचा उपयोग झाला खरा!

आंत सगळी गडबड सुरू होती. मधू किलबिलत होती, हंसत होती, ओरडत होती, हुकूम सोडीत होती! माझ्या सदा शांत असलेल्या घरांत एकदम उठलेल्या या वावटळीमुळे मी कासावीस होऊन गेलों होतों.

पुन्हा नंदिनी आली आणि तिनें विचारलें तर होकार द्यायची माझी तयारी नव्हतीच नव्हती. कोणता बुद्धिवाद करूं? काय उत्तर देऊं? नंदिनीची कशी समजूत घालूं? माझें मस्तक चकरा खाऊं लागलें.

हातीं पुस्तक घेऊन मी वाचण्याचें ढोंग करीत होतों तोंच माझ्या

कानीं शब्द आले, " पुन्हां हवा का थोडा चहा ? आमचे बाबा घेतात मधून मधून, सारखं आधण सुरू असतं. तुमचं आहे का तसं तात्या ?"

" कसं असणार !" मी मधूकडे बघून म्हटलें, " उठल्या सुटल्या मला चहा द्यायला इथं कोण आहे ?—अन् मला नकोही आहे चहा. असल्या भलत्या संवयी लागायला नको आहेत. तूं आहेस तोंपर्यंत देशील—मला संवय लागेल—पण मग मला दुकानांचे उंबरठे झिजवावे लागतील."

" ही देईल कीं चहा करून ! "

" कोण 'ही' ?"

" ही पासोडीवाली !"

" ती कशाला येते इथं ? तिचा स्वतःचा मोठा बंगला आहे मलबार हिलवर. मोटरी आहेत दोन. खूप श्रीमंत आहे !"

" मग तिला हे भिकेचे डोहाळे कां आठवले ?"

" भिकेचे डोहाळे कसले ?"

" पासोड्या नेसून तुरुंगांत कशाला जातेय ? आईबाप नाहींत वाटतं कुणी तिचे ?—अन् नवरा ?"

" तिचं लग्नच झालं नाहीं अजून !" मी चांचरत बोलून गेलों.

" मला वाटलंच तें !" पुन्हां डोळे मिचकावीत माझ्यासमोर तर्जनी करून ती म्हणाली, " कसा वास येतो आम्हां बायकांना ! तेव्हांच वाटलं मला. म्हटलं, यांत कांहींतरी आहे ! तिची नजरच सांगत होती. अशी डोळे भरभरून तुमच्याकडे पाहात होती— जसा कांहीं जीव आला होता अगदीं डोळ्यांत ! छान आहे बिचारी !"

" भलतंच काय बोलतेस ?" मी रागाचा आव आणीत म्हटलें, " ती कुठं, मी कुठं ! माझ्यासारख्या पन्नास जणांना नोकर म्हणून राबवायची ताकद आहे तिच्यांत."

" म्हणूनच ना मी म्हणतें—"

" काय म्हणतेस ?"

" ही फांस घालणार एक दिवस तुमच्या गळ्यांत !"

" नोकर म्हणून ?"

" नाहीं—नवरा म्हणून !"

मी हंसत सुटलों. तें माझें हंसणें मलाच भेसूर वाटलें.

" पहाल, पहाल;" ती हात उडवीत म्हणाली, " तुम्ही पाहाल अन् मीही पाहीन !"

आतां मी कांहीं उत्तर दिलें असतें तर मधूचें चऱ्हाट आणखी लांबलें असतें. मी कांहींच बोलत नाहीं असें पाहून ती म्हणाली, " नका बोलूं हवे तर—हेच डोळे आणि हेच तमाशे. दिसेल काय व्हायचं आहे तें. चला आतां, लवकर आंघोळ करा. मला तें कॉंग्रेस हाऊस पाहायचं आहे. तो गडीसुद्धां सांगत होता कितीतरी गोष्टी. फार उत्कंठा लागली आहे मला पहायची. लवकर जेऊन जाऊं तिकडे."

ती हुकूम करीत होती आणि मी मुकाट्यानें ते पाळीत होतों. काय झालें हें मला ? कसा मी असा दुबळा बनलों ? कुठलीशी कुणी पोर—नुसता घरांत पाय ठेवला नाहीं तोंच माझ्यावर सत्ता गाजवूं लागली ! आणि अगदीं मुकाट्यानें मी तिच्या हुकुमापुढें मान वांकवूं लागलों ! अशी वावटळ तिनें उठविली होती, कीं नंदिनीबद्दल सुद्धां विचार करायला माझें मन स्थिर होईना. आणि आतां ही कॉंग्रेस हाऊसमधे जाते म्हणते ! तिनें 'नीघ' म्हणतांच मला जाणें भाग येणार, आणि तिथें गेलों, नंदिनी भेटली आणि तिनें विचारलें—त्याच प्रश्नाबद्दल विचारलें—तर मी काय उत्तर देऊं ?

मनाच्या बावरलेल्या स्थितींत कांहींतरी निश्चित विचार ठरविल्या-वांचून मला गत्यंतर नव्हतें.

इकडे माझे नित्यक्रम चालले होते आणि इकडे मस्तक भ्रमण करीत होतें. मी अगदीं कातावून गेल्यासारखा झालों होतों—त्यांतच मधूची टकळी सुरू होती. तिच्या प्रश्नाला होय किंवा नाहीं कांहींतरी उत्तर द्यावेंच लागत होतें, आणि चुकून मी भलतेंच उत्तर दिलें म्हणजे ती माझी टर उडवी.

" मला माहित आहे—तुमचं मन आज ठिकाणावर नाहीं. किती शिक्षा होईल तिला, या काळजींत आहांत तुम्हीं. किती दिवस भेट होणार नाहीं, या कल्पनेनं तुम्ही घाबरून गेलां आहांत. फोटो घेऊन ठेवा तिचा

एकादा—इथं कुठं फोटो दिसला नाहीं तिचा ? असं कसं झालं हं ? बाकी रोज भेटल्यावर फोटोची पर्वा कोण करतो म्हणा ! मात्र आतां एक फोटो घेऊन ठेवा. अन् त्या संदेशाचीही एक नक्कल करून ठेवली पाहिजे मला. 'रिन्युअल' म्हणे ! मोठी दांभिक दिसते. कसे जळजळीत उद्गार आहेत अंतःकरणांतले !"

ती सारखी बडबडत होती आणि मी मुकाट्यानें जेवीत होतों.

वडीलांच्या मृत्यूनंतर घरच्या चुलीवर शिजवलेलें हें पहिलेंच जेवण होतें.

——:०:——

# ११

मधूला घेऊन मी कॉंग्रेस हाऊसमधें गेलों. पण तिथें जातांच, इतके प्रश्न करून तिनें मला भांडावून सोडलें, कीं कुठली मी तिला इथें घेऊन आलों असें मला झालें. नंदिनी भेटली असती तर मधूला तिच्या हवालीं केली असती पण तीही कुठें बाहेर गेली होती.

सुदेवानें मला सुरेंद्र भेटला. मधूची आणि त्याची मी ओळख करून दिली. तसें पाहिलें तर सुरेंद्राचे आणि माझे असें मोठेसें कुठें रहस्य होतें ! थोडासा आपलेपणा जर कधीं उत्पन्न झाला असेल तर कॉंग्रेस हाऊसमधें तो भेटल्यानंतर. पण मधूला हातावेगळी करण्यासाटीं मी इतका उतावीळ झालों होतों, कीं सुरेंद्राची आणि तिची गांठ घालून देण्यांत आपण चूक करतों आहों कीं काय, हा प्रश्न मनांत येऊनसुद्धां मी दृष्टीआड केला.

कांहींवेळ त्या दोघांबरोबर मी इकडे तिकडे हिंडलों. घरांत पाऊल टाकतांच, एका क्षणांत जिनें माझ्या संसाराचा कबजा घेतला—मी तरी कुठें तिच्या परिचयाचा होतों ?—तिला सुरेंद्राची ओळख करून घ्यायला माझी मध्यस्ती नको होती.

घाईघाईनें त्या दोघांचा निरोप घेऊन मी दाराबाहेर पडत होतों तोंच मोटरींतून नंदिनी कॉंग्रेस हाऊसच्या दारांत आली. मला पाहातांच तिनें मोटर थांबवली. तिच्याबरोबर बॉर कौन्सीलचे अध्यक्ष होते. ते खालीं उतरून गेले. तिनें मला आंत बसायला सांगितलें आणि मोटर पुन्हा बाहेर वळवली.

ती स्वतःच मोटर चालवीत होती. मी पुढल्या सीटवर तिच्या शेजारीं

बसलों होतों. तिनें 'ये' म्हणतांच मी कां गेलों तें माझें मलाच कळलें नाहीं. मी कांहीं खादींत नव्हतों. तेव्हां लोकदृष्ट्या तें दृश्य गौणच होतें.

आम्हीं नंदिनीच्या बंगल्याशीं येऊन पोंचलों. तोंपर्यंत ती एक शब्दही बोलली नाहीं.

दिवाणखान्यांत येऊन पोंचतांच तिनें कोचावर अंग टाकलें. ती स्वतः होऊन बोलेपर्यंत आपण कांहींच विचारायचें नाहीं असें मी ठरविलें होतें.

"कां, बोलत कां नाहीं?" ती वर छताकडे पहात मला उद्देशून म्हणाली.

"बोलायचं काय! अन् कुणी बोलायचं? रस्त्यांत मी भेटलों—पोलीस लोक एकाद्याला पकडून नेतात तसं मला पकडून तूं इथं आणलंस. आतां बोलायचं तूं—मी नव्हे."

"अगदीं कायदेशीर बोलतोयस! कुठली लहर आली ही? सकाळीं मी मुद्दाम आलें होतें—पण कांहींच बोलतां आलं नाहीं. आतां तुझी भेट होईल असं वाटलं नव्हतं. मीच येणार होतें—" पुढें काय बोलावें याचा जणूं काय ती विचार करीत होती

मधूचा तिनें उल्लेखसुद्धां केला नाहीं, याचें मला आश्चर्य वाटलें.

"आज उद्यां मी पकडली जाणार यांत शंका नाहीं!" उठून माझ्या शेजारी ती बसत म्हणाली, "त्यापूर्वी निश्चितपणा आला पाहिजे माझ्या आयुष्याला. खरं ना?"

मी अगदीं स्तब्ध राहिलों. तिच्या भाषणाचा रोख मला कळला होता.

"तुला चमत्कारीक वाटेल—" ती माझ्या डोळ्याकडे निरखून पहात म्हणाली, "उतावीळपणा वाटेल—अविचार वाटेल-पण आज कित्येक दिवस पूर्ण विचार करून मी ठरवलं आहे. खरं पाहिलं तर हा प्रसंग अगदीं उलटा झाला आहे. तूं माझा पिच्छा पुरवायचा अन् मी तुम्हांला झुलवीत ठेवायचं, असं व्हायला पाहिजे होतं—"

माझें काळीज धडधडूं लागलें—प्रकरण अगदीं हातघाईला आलें होतें. आतां निश्चित उत्तर देण्याखेरीज गत्यंतर नव्हतें. मनाचा हिय्या

करून मी म्हटलें, "असं झालं आहे खरंच. हें सारंच मला विलक्षण वाटतं आहे, एकमेकांची मनं जुळलीं आहेत यांत शंका नाहीं—"

"थँक्स, मग अडलं कुठें ?"

"पण परिस्थिती जुळत नाहीं. आज तूं तुरुंगांत गेलीस तर उद्यां येणारच आहेस. आल्यावर काय करायचं ? खरं पाहिलं तर वधूनं वराच्या घरीं राहायचं. पण ही कुबेराची संपत्ती टाकून तूं माझ्या भानगड गल्लींत कशी राहायला येशील ?"

"तर मग तूंच इकडे ये."

"कल्पना नवीन आहे." मी हंसत म्हटलें, "पण मनाला पटत नाहीं—अनादिकालचे मनाचे संस्कार मोठे प्रबल असतात. नवऱ्यानं येऊन बायकोच्या घरीं राहायचं !—छे : ही कल्पनाच मोठी चमत्कारीक वाटते—"

"पुष्कळ चमत्कारीक गोष्टी आज प्रत्यक्षांत आल्याच आहेत कीं नाहीं? आपण कांहीं सामान्य माणसं नाहींत. आपण कांहींतरी असामान्यत्व करून दाखवूं—जगाला नवा धडा घालून देऊं!" कांहींतरी नवीन कल्पना सुचल्याची चमक तिच्या चेहऱ्यावर खुलली. चटकन् वळून माझे दोन्ही हात आपल्या हातांत धरून ती म्हणाली, "आपण असं करूं, एक आठवडा मी तुझ्याकडे राहायचं न् एक आठवडा तूं माझ्याकडे राहायचं ! कसं ?"

कल्पना मला पटली आणि मी हंसलों.

"पटलं तुला ! पटलं तुला !—" असं म्हणत ती एकाद्या अल्लड पोरीसारखी खिदळूं लागली. स्वाभाविक गंभीरपणा सोडून तिनें दाखविलेल्या या तारुण्यसुलभ बेतालपणामुळें मला राग यायच्या-ऐवजीं आनंदच झाला.

"आतां अगदीं शंकाच नाहीं !" माझे दोन्ही गाल आपल्या दोन्ही हातांत धरून माझी नजर पकडून ती म्हणाली, "कसं वठणीवर आणलं ? मला माहीत होतं—अडचण होती ती हीच. खूप खूप विचार केला मी काय एवढं ओढून धरलंय ? पण कशी खूण पटली ! ही मनोमन साक्ष बरं! दोन अंतःकरणं एक झाल्याचं हें लक्षण. खरंच—मला मोठी

गंमत वाटते. आजच्या आज उरकून घेतलं पाहिजे, होय ना ? होय ना ? होय ना ? ?"

" होऊन जाऊं दे एकदां तुझ्या मनासारखं !" असें म्हणून मी मोकळा झालों.

ती गंभीर झाली—कधींही न घडलेली गोष्ट मी पाहिली—तिच्या डोळ्याच्या पापण्या ओल्या झाल्या–टचूकन् एक टिप तिच्या गालांवर ओघळलें.

मला गहिंवर आला. सद्‌गदीत स्वरानें मी उद्‌गारलों" नंदिनी !"

" हा माझा खरा पाडोबा !" असे म्हणून तिनें माझ्या गळ्याला मिठी मारली.

केवढा तरी काळ निघून गेल्यासारखें मला वाटलें. माझें हृदय फुलून गेलें होतें. विचार सुचत नव्हता. बुद्धिवाद थांबला होता. भावनेच्या भरारीबरोबर मी आकाशांत तरंगत होतों. देहाची विस्मृती झाली होती.

कुणाला खरें वाटणार नाहीं, पण त्या भावनेंत कामुकतेचा लवलेश-सुद्धां नव्हता. मानसिक आकर्षण म्हणून कांहीं असतें—शारीरिक आकर्षणापेक्षां तें जास्त प्रबल असतें—जास्त तीव्र असतें—त्या आकर्षणाच्या आत्यंतिकतेंत देहाची विस्मृती होते-अंतरंगाची जागृती होते–हें सर्वांनाच सांगून पटणार नाहीं. त्या क्षणाला मी तो अनुभव घेतला.

तो अनुभव वर्णनातीत होता. एका क्षणाची भेट, पण तो कालावधी कितीतरी मोठा वाटला—मोठा वाटला म्हणूनच लवकर संपला.

तो क्षण निघून गेल्यावर मी मनाशीं विचार केला. भावनेच्या भरांत मी ही कबुली दिली का ? तात्कालिक परिणामाला मी बळी पडलों का ? संसाराचा पसारा थाटण्याचा तिटकारा बाळगणारा मी, तो या फंदांत कसा पडलों? ही चूक झाली का ?

उत्तर जसे कांहीं नंदिनीच्या तोंडूनच आलें. ती म्हणाली, " झालं हें अचानक झालं असं कुणी म्हणेल?—मला तसं वाटत नाहीं. किती दिवस तरी ही कल्पना माझ्या मनांत घोळत होती. तुझ्या मनांत पूर्वी घोळत नसली तरी त्या एका दिवसाच्या प्रकारानंतर तुझीही जाणीव

जागी झाली असेल. मी कांहीं हा अविचार करीत नाहीं. कितीतरी तरुण माझ्या भोंवती गोळा होत होते, त्यांतलें कांही गरीब होते, कांहीं श्रीमंत होते—बहुतेक सारे नजरेंत भरण्यासारखे होते. पण त्या सर्वांना टाकून माझी दृष्टी तुमच्याकडे वळली ती आंधळेपणानं नव्हे—मनांत कांहीं ठेवायचं नाहीं म्हणून अगदीं स्पष्ट बोलतें—ही 'माझी' निवड आहे—मला प्रेमांत गोंवण्याचा 'तू' केलेला प्रयत्न नव्हे. मी तुला ओढून आणलं—तुझ्या इच्छेविरुद्ध ओढून आणलं. तुझी इच्छा नव्हती हेंच मला विशेष वाटलं. मी श्रीमंत आहे तशीच सुंदर आहे हें विसरण्याइतकी मी दांभिक नाहीं. माझ्या देखणेपणाची मला जाणीव आहे. स्वाभाविक सौंदर्य असलं तरीदेखील अधिक चांगलं दिसण्यासाठीं मी खूप नट्टापट्टा करतें. एकेकाची मी परीक्षा घेतली—साम्यवादासाठीं का हे माझ्या सभोंवार गोळा होत होते?—सारे लाळघोटे आहेत याचा मला प्रत्यय आला. अगदीं स्पष्ट सांगतें,' तूं त्यांच्यासारखा वागला नाहींस म्हणूनच माझं मन तुझ्याकडे ओढलं—"

"पुरे, पुरे!" मी उतावीळपणें म्हटलें, "आतां जास्त बोलूं नकोस. जें मला समजायचं तें समजलं—"

"थांब जरा" असें म्हणून ती टेलीफोनकडे गेली आणि आर्य समाजाला तिनें फोन केला. टेलिफोनवरच्या तिच्या भाषणावरून मला कळून आलें, कीं आधींच तिनें सर्व तयारी करून ठेवली होती.

एवढासुद्धां गाजावजा न करतां त्या दिवशीं आर्यसमाजांत आमचा विवाह झाला. मी मधूला विसरलों नव्हतों, पण—मला काय वाटलें कोण जाणे, या विधीच्या वेळीं मी तिला बोलावून आणलें नाहीं, इतकेंच नव्हे, तर आम्ही दोघेंही घरीं येईपर्यंत मी तिची चौकशीसुद्धां केली नाहीं.

ही उपेक्षा नव्हती—मी तिची कसोटी पहात होतों.

आम्ही घरीं आलों त्यावेळीं मधू त्यापूर्वीच आली असल्याचें दिसून आलें. आम्हांला दोघांना पाहातांच ती उद्गारली, "आलांत उभयतां!"

मी दचकलों. हिला कळलें वाटतें !

" कुणी आणून पोंचवलं तुला ?" मी विचारलें.

' मीच आलें कीं !" मधू म्हणाली, " एवढासा रस्ता काय माझ्या ध्यानांत रहात नाहीं ?"

विषयाचा उपक्रम कसा करावा याची मला पंचाईत पडली. नंदिनी कांहीं न बोलतां एका कोचावर बसली होती. लग्नविधीच्या वेळीं लावलेलें टिळे वगैरे पुसून साफसुफ करून आम्ही आलों असल्यामुळें आम्ही सांगितल्याशिवाय मधूला कांहीं कळणें शक्य नव्हतें.

वडीलकीच्या अभिनिवेशानें मी मधूला हांक मारली. माझी ती मुद्रा पाहून आश्चर्य वाटल्यासारखें करून ती म्हणाली, " काय झालं ? असे इतके गंभीर कां झालेले दिसतां तात्या ?"

तिच्या त्या प्रश्नाचें मला हसूं आलें. कसें सांगावें याचा मी विचार करीत होतों. मी म्हटलें, " सकाळीं हिची मी तुला ओळख करून दिली— हिची हकीकतही सांगितली—पण आतां पुन्हा ओळख करून देणार आहें."

" पुन्हा ओळख ?" तिनें कुतूहलानें विचारलें, " पुन्हा ओळख करून देण्यासारखं असं काय झालं ?"

" तसंच कांहीं झालंय !" मी जरा लाजूनच म्हणालों, "तिचं माझं आज लग्न झालंय !"

मधू आ वासून नुसती टकमक पाहात राहिली.

नंदिनीच्या गालावर लाजेची लाली आली.

" खरंच ?" नंदिनीच्या गळ्यांत हात टाकीत मधूनें विचारलें.

नंदिनीनें नुसती होकारार्थी मान हालवली. अगदीं अनपेक्षित अशी मुग्ध लज्जेची छटा तिच्या चेहऱ्यावर चमकत होती.

धांवत येऊन माझा हात धरून 'शेक हँड' करीत मधू म्हणाली, " I congratulate you Pandu Tatya—" माझ्या हातांत तसाच हात ठेवून नंदिनीकडे वळून ती म्हणाली " कसला गबाळया नवर पसंत केलास हा वहिनी ?"

"एका दिवसाच्या परीक्षेनं नाहीं कळत!" नंदिनी गंभीरपणें म्हणाली, "हे काय जुन्या वधू-वर-परिक्षेचे दिवस नव्हत. चांगल्या पांच पन्नास माणसांतून निवडून काढला आहे मी हा नवरा!"

"सकाळीं मला वाटलंच!" मधू म्हणाली, "पण तात्या कसले खंबीर! मला दादसुद्धां लागू दिली नाहीं."

"त्याला तरी कुठं होतं ठाऊक?" नंदिनी उद्गारली

"अस्सं!" आम्हां दोघांकडे आळीपाळीनें पाहात मधूनें विचारलें, "एकूण हें असं झालं आहे का?—वधूनं वराची निवड केली—वर गेला नाहीं वधूच्या दारीं!"

"अगदीं अस्संच!" असें म्हणतांना मीसुद्धां लाजलों.

"I Congratulate you नंदूवहिनी!" असें म्हणून मधूनें हात धरून नंदिनीला चांगलेंच खुदळलें "पुढल्या पिढीला चांगला धडा घालून दिलास हा. आतां मी आलेंच आहे मुंबईला. परिक्षा होई-पर्यंत मला हाच उद्योग केला पाहिजे."

आम्ही दोघेंही मोठमोठ्यानें हंसलों.

"मग आतां लग्नाचं जेवण?" मधूनें विचारलें, "आपलं रोज-च्चं जेवण, कीं कुठं एखाद्या मोठ्या हॉटेलांत जायचं? आमंत्रणं असतीलच मित्रमंडळींना?"

"छे छे. तसलं कांहीं नाहीं. एक तासांत सारं आटोपून घेतलं. यापलीकडे कांहींसुद्धां करायचं नाहीं."

"मोठीं लबाड आहांत तुम्हीं!" मधू म्हणाली, "मोठीं कंजूष असतां तुम्हीं श्रीमंत माणसं. आधीं सांगितलं नाहीं तें नाहीं पण नुसतं जेवणसुद्धां नाहीं?—मेजवानीसुद्धां नाहीं? तुम्हीं स्वतः तरी जेवणार आहांत कीं नाहीं? कीं लग्न करतांच भुका मेल्या?"

पुन्हां आम्ही तिघेही हंसलों. तिघांचीहीं हृदयें उचंबळून आलीं होतीं.

सर्वत्र आनंदाची छाया पसरली होती गडी आणि सैंपाकीसुद्धां आपापसांत खिदळत नि कुजवुजत होते.

इतक्यांत खालीं जयजयकाराचा गजर ऐकूं आला. जिन्यावर धाड धाड पावलें वाजलीं.

खालीं रस्त्यावर एकच हुल्लड सुरू होती.

पोलीस सार्जंट वर आले आणि नंदिनीला त्यांनीं गिरफतार केलें.

जातां जातां नुसता माझा हात जोरानें दाबून नंदिनी निघून गेली.

मधू नुसती पाहात राहिली होती.

"कसलं मेलं हें लग्न !" असें म्हणत मधू कोचावर मट्कन् बसली.

नंदिनीच्या जयजयकारानें सारी गल्ली दणाणून गेली होती.



# १२

नंदिनीला सहा महिन्याची शिक्षा झाली हें ऐकून मधूला मोठा धक्का बसला. त्या गडबडीच्या काळांत मुंबईबाहेर राहाणाऱ्या माणसांना या शिक्षेचें चीज वाटत होतें. मुंबईत हें शिक्षेचें सत्र इतक्या झपाट्यानें चाललें होतें, कीं त्याची पर्वा कुणालाच वाटत नव्हती. साऱ्या तुरुंगांतून गर्दी झाल्यामुळें वरळीवरच्या सिमिटाच्या चाळीसुद्धां कुंपणाच्या तारांत वीज सोडून तुरुंग म्हणून वापरल्या जात होत्या.

त्या दिवशीं मधू फार अस्वस्थ झाली होती. क्रॉनिकल, फ्री प्रेस, ज्ञानप्रकाश आणि नवाकाळ इत्यादि वर्तमानपत्रांचे मागील अंक आणून या चळवळीच्या इतिहासाचा छडा लावीत ती बसली होती. ज्ञानप्रकाश-सारख्या मवाळ समजल्या जाणाऱ्या पत्रानेंही या लढ्याबद्दलच्या हकीकती सहानूभूतिपूर्वक प्रसिद्ध करण्याचा केलेला सुव्यवस्थित उपक्रम तिच्या मनावर परिणाम करण्यास कारणीभूत झाला. ती म्हणाली, "हीं बाकीचीं पत्रं कॉंग्रेसवाल्यांचींच आहेत. ज्ञानप्रकाश कांहीं कॉंग्रेसवाला नाहीं; म्हणूनच मला त्याच्या बातम्या जास्त अधिकृत वाटतात. तिकडे आम्ही या चळवळीवर फारसा विचार करीत नव्हतों—संस्थानांतच होतों कीं नाहीं आम्ही ?—पण प्रत्यक्ष इथं आल्यावर मलादेखील हिरिरी येऊं लागली आहे ?"

म्हणजे ? मधूदेखील आतां तुरुंगात जणार का ? कां मला ही भिती वाटली !

एकाच दिवसांत माझ्या मनोवृत्तींत अजिबात बदल होऊन गेला

होता. इतके दिवस आम्ही दोन दोस्त होतों पण फारसें अवडंबर न माजवतां कांकडवाडीतल्या एका लहानशा जागेंत होमहवन करून झालेल्या त्या विधीमुळें नात्याचा जिव्हाळा उत्पन्न झाला. ' माझी बायको तुरुंगात गेली ' या एकाच गोष्टीचा विचार करीत मी सुन्न होऊन बसलों होतों.

काल मी एक एकलकोंडा जीव होतों—आज मी एक संसारी माणूस झालों होतों. ज्या दिवशीं संसार थाटला त्या दिवशीं—नव्हे त्याच क्षणाला—तात्पुरता कां होईना—माझा संसार उधळला होता. आतां आधार वाटत होता काय तो मधूचा—आणि तिच्या डोक्यांत हें वेड शिरूं लागलें होतें !

बरा एकटा एक होतों—मोठ्या सुखांत होतों ! तोंच कशाला हे नवे लागेबांधे उत्पन्न झाले ? नसती विवंचना मागें लागली. नंदिनीचें नातें मी बुद्धीपुरस्सर जोडून घेतलें होतें, पण मधू आली ती कांहीं माझ्या संमतीनें नव्हे. जन्मभर एकटा राहीन आणि एकटाच मरून जाईन, असें जें मला वाटत होतें तें फोल ठरलें.

हे सारे प्रकार चालले असतां सुरेंद्राचा उल्लेख कुणीच केला नाहीं. मधूसुद्धां कांहीं बोलली नाहीं म्हणूनच मला भीति वाटूं लागली. मधूला विचारावें असें माझ्या मनांत येत होतें, पण मी वाट पाहिली. तो सारा दिवस अस्वस्थतेंत गेला.

वर्तमानपत्रांच्या फायली चाळीत मधू बसली होती. मी नुसताच विचार करीत आरामखुर्चीवर पडून होतों. कॉंग्रेस हाऊसकडे जावें असें—सुद्धां मला वाटलें नाहीं. मधू मात्र संध्याकाळीं तिकडे एक चक्कर मारून आली.

नवें युद्धमंडळ नेमले होतें. युद्धांतल्या गडबडी सुरू झाल्या होत्या. रोज मिरवणुका, पिकेटिंग, प्रभात फेऱ्या, व्याख्यानें, सारखी कांहीं ना कांहींतरी गडबड सुरू होती. रोज माणसें तुरुगांत जात होतीं आणि रोज त्यांच्या जागीं नवी माणसें निर्माण होत होतीं.

कॉंग्रेस हाऊसमधें रोज जाण्याचा क्रम मधूनें सुरू ठेवला होता. तिकडे जाण्याचे माझ्या जिवावर येई. नंदिनीच्या बंगल्यावर मला रोज एकादी खेप घालावी लागे. तिचा दिवाणजी मोठा व्यवस्थित माणूस होता. रोजच्या व्यवहाराचा पाढा, मी गेलों, कीं तो माझ्यासमोर वाचून दाखवी.

नदिनीनें तुरुंगात जाण्यापूर्वीं जे व्यवस्थापत्रक करून ठेवलें होतें त्याप्रमाणें सर्व व्यहार सुरळीत चालले होते.

हा एक नवाच जंजाळ माझ्या मागें लागला असें मला वाटलें. मोठमोठ्या इस्टेटींची कशी काय उलथापालथ होत असते याची मला चांगलीशी कल्पना नव्हती. तो नवा अनुभव मी घेत होतें.

कॉलेजांत जाण्याचें सोडून मधू काँग्रेस हाऊसभोंवतीच घोटाळते आहे असें पाहून मला माझ्या जबाबदारीची जाणीव उत्पन्न झाली. मी विचारलें तेव्हा ती म्हणाली, " मी तरी काय करूं. मला प्रवेशच मिळाला नाहीं. पण खरं सांगायचं तात्या, तर प्रवेश मिळाला असता तरीही मी कॉलेजांत गेलें नसतें. या चळवळींत माझं मन रंगून गेलं आहे. मी प्रत्यक्ष भाग घेत नाहीं पण रोज जाऊन तिथं काय चाललं आहे हें पाहिल्याशिवाय मला बरंच वाटत नाहीं."

" एवढंच ना ?" मी विचारलें.

ताड्कन् उठून येऊन मधू माझ्यासमोर येऊन म्हणाली, " या प्रश्नाचा काय अर्थ ?"

ती चिडल्यासारखी दिसत होती. मी चपापलों. मी अगदीं सहज बोलून गेलों होतों पण त्या एकाच शब्दाचा ती असा अर्थ घेईल असें मला वाटलें नाहीं.

" खरं सांगूं मधू, तुला राग येण्याजोगा माझा उद्गार होता खरा —मी कांहीं तुझ्यावर नजर ठेवीत नाहीं अन् तशी नजर ठेवायची आवश्यकता आहे असं मला वाटलंही नाहीं. मी अगदीं साहजिक विचारलं होतं. तसं पाहिलं तर मी कांहीं फारसा वडील माणूस नाहीं. स्वाभाविकपणें तूं मला वडीलकीचा मान देतेस, हा तुझा चांगुलपणा. वडीलकीचे अधिकार मला गाजवायचे नाहींत—पण तुझ्या वडीलांनीं तुझी जबाबदारी माझ्यावर टाकली आहे. मी जितकी चौकशी करावी तितकी केली नाहीं ही माझी चूक झाली खरी, पण तेवढी चौकशी करायची मला जरुरीही वाटली नाहीं. तुझी तूं चांगली समर्थ आहेस—रागावूं नकोस, पण प्रत्येक गोष्ट मला सांगत जा. हें तुझ्या कॉलेजचं मला कांहींच कळलं नव्हतं."

" माफ करा तात्या !" मधू शांत होऊन म्हणाली. " मला वाटलं

तुम्ही माझा संशय घेतला. आमच्या तिकडे मुलींच्या बाबतींत सारेच मोठे साशंक असतात त्यामुळं मला तसं वाटलं. माझी चूक झाली. बाबांना मी पत्रांत कॉलेज बद्दल लिहीलं आहे. पण कॉलेजबद्दल मी तुम्हांलाही सांगायला पाहिजे होतं."

"जाऊं दे तें" मी तिला चुचकारीत म्हटलें "पुढें नीट ध्यानांत ठेव म्हणजे झालं."

तो विषय तेवढाच राहिला. पण त्यामुळें माझ्या मनांत वडीलकीच्या जबाबदारीची जाणीव उत्पन्न झाली. नंदिनी तुरुंगांत गेल्यापासून मी काँग्रेस हाऊसकडे फिरकलों नव्हतों—तिकडे जावेंसेंच मला वाटत नव्हतें —पण आतां जाणें भाग आहे असें मला वाटूं लागलें. मुंबईला अपरिचित असलेली मुलगी, एवढ्या मेळाव्यांत एकटीच जाते म्हणून थोडी काळजी घेणें भाग होतें.

त्या दिवशीं मी काँग्रेस हाऊसमधें गेलों. दारांतच एक मोठा घोळका जमला होता. मधे एक कुणीतरी गोरा साहेब उभा होता. मला वाटलें, सार्जंट असेल. चौकशी करतां कळलें, कीं जॉर्ज स्लोकोम्ब नांवाचा तो एक विलायतेंतल्या वर्तमानपत्रांचा प्रतिनिधी होता. तिकडल्या राजकारणांत त्याचा बराच हात होता. या चळवळीचें निरीक्षण करण्यासाठीं तो मुद्दाम आला आहे, असें कुणी म्हणत होते.

मोठ्या निर्भयपणें मधू त्याच्याशीं चर्चा करीत आहे हें पाहून मला आश्चर्य वाटलें. मला तरी धीर झाला नसता!

सारा घोळका बोलत बोलत वर ऑफिसांत गेला. स्लोकोम्ब साहेब काँग्रेस हाऊसमधल्या सर्व विभागांची पाहाणी करीत होता आणि त्यावेळीं इतरांबरोबर मधू त्याच्या बरोबरच होती.

तितक्यांत सुरेंद्र मला भेटला—नव्हे त्यानेंच मला गांठलें आणि माझें अभिनंदन केलें. आमच्या लग्नाच्या हकीकतीची कुठेंच प्रसिद्धी झाली नव्हती—आणि हें याला कसें कळलें? मी विचारलें तेव्हां तो म्हणाला, "जायच्या पूर्वीं नंदिनीनंच मला सांगितलं. एके काळीं तिचा माझ्याबद्दल गैरसमज झाला होता. त्याला तसंच कारणही झालं होतं. आतां चोरून कशाला ठेऊं! नंदिनीला मी मागणी घातली होती. तिनं मला

झिडकारलं नाहीं पण अशा कांहीं शब्दांत तिनं ती मागणी नाकारली, कीं पुनः तिची भेट घ्यावी असं वाटलं नाहीं. इथं काँग्रेस हाऊसमधें देखील ती माझ्याशीं तुटकपणानं वागे. त्या दिवशीं तिनं ज्यावेळीं माझ्याकडे बोलायचा उपक्रम केला त्यावेळीं मला आश्चर्य वाटलं. अगदीं मोकळ्या मनानं जेव्हां तिनं मला आपला निश्चय सांगितला, त्या निश्च-याची कारणंही अगदीं उघड सांगितलीं, त्यावेळीं माझं समाधान झालं. तुम्हाला कदाचित् माहीत नसेल मी एका लक्षाधाशीचा मुलगा आहें. बापाशीं भांडण होऊन, मी वेगळा राहातों खरा पण बापाचे पैसे घेतल्या-शिवाय मला गत्यंतर नाहीं. नोकरी करायची माझी प्रवृत्ती नाहीं. सार्व-जनिक कार्य करायचं आणि इकडे पोटासाठीं नोकरीही करायची, या दोन्ही गोष्टी साधणार नाहींत असं वाटलं, म्हणूनच बापाच्या पैशावर मी जगतों. लहानपणापासून ऐषआरामाची संवय लागलेली. ती एकदम टाकतां येईना म्हणूनच माझा नाईलाज झाला—" त्यानें एक मोठा सुस्कारा टाकला.

आपली हकीकत माझ्यासमोर उघड बोलून दाखवीत असतां त्याला अंतरांतून यातना होत होत्या, असें त्याच्या मुद्रेवरून स्पष्ट दिसत होतें. तो पुढें म्हणाला, "केव्हां तरी हें अवजड जूं झुगारून देईन असं मला वाटतं आहे पण आज तरी तें शक्य नाहीं. एक आशा होती—आज ना उद्यां नंदिनीचं मन पालटेल असं मला वाटलं होतं; पण आतां ती एक निःश्चिती झाली. तसं कांहीं वाटून घेऊं नका. पूर्वी आपण एकमेकांपासून बरेच दूर होतों पण आतां फार जवळ आलों आहों. मत्सर वाटायच्या ऐवजीं मला उलट तुमच्याबद्दल आदरच वाटूं लागला. सध्यां मलाही कुणी नाहीं आणि तुम्ही तर पूर्वीपासूनच एकटे! आपण यापेक्षां जरा जास्त जवळ येऊं! कसं?"

हा प्रश्न अनपेक्षित होता. कांहीं तरी उत्तर देऊन मी वेळ मारून नेण्याचा प्रयत्न करणार होतों तोंच मधू तिथें आली आणि विषय तेव-ढाच राहिला.

ती स्लोकोम्ब साहेबांच्या हकीकती सांगत होती. मला त्यांत विशे-षसें गम्य नव्हतें.

पण मला एवढेंच दिसून आलें, कीं सुरेंद्राशीं तिचा परिचय बराच घनिष्ठतेचा झाला होता.

घरीं आल्यावर मी तिला सुरेंद्राबद्दलचें तिचें मत विचारलें तेव्हां ती म्हणाली, " तिथं जमणाऱ्या बऱ्याचशा माणसांसारखा तो नाहीं. सुरेंद्र बराच प्रामाणिक दिसतो. कांहीं नुसते हुल्लडीसाठीं आले आहेत, कांहीं काम करण्याच्या खुमखुमीनं आले आहेत, कांहीं पराक्रम करून मोठेपणा मिळविण्यासाठीं आले आहेत आणि कांहीं कांहींसुद्धां काम न करतां उगीच मोठेपणा मिरवण्यासाठीं आले आहेत. या सर्वांपेक्षां सुरेंद्र मला निराळा वाटतो. कोणत्याच विभागांत तो प्रामुख्यानें दिसत नाहीं. पण प्रत्येक विभागांत त्याचा कांहीं ना कांहीं हात असतो. उघड उघड कोणत्याही चढावांत भाग न घेतां पडद्याआडून सूत्रं चालवणारी जी एक ' शॅडो ' कमिटी आहे त्यांतला तो एक आहे—"

तिथलीं कामं कशीं चालतात याची हकीकत जेव्हां ती मला सांगूं लागली तेव्हां सुरेंद्राबद्दल तिच्या मनांत बराच आदर उत्पन्न झाला असल्याचें मला दिसून आलें.

मला प्रश्न पडला, या आदराचें पर्यवसान काय होणार ? दोघांची घनिष्टता वाढणार तर नाहीं ! बरं वाढली तर काय बिघडलं ?

सुरेंद्रानें त्या दिवशीं मला सांगितलेली सर्व हकीगत जेव्हां मी तिला सांगितली तेव्हां तिची मुद्रा एकदम पालटली. बराच वेळ ती अगदीं स्तब्ध बसली. मला वाटलें, तिच्या मनावर कुठें तरी आघात झाला. उत्पन्न झालेल्या कांहींतरी कोंवळ्या भावना कुठें तरी दुखावल्या गेल्या.

" मला नाहीं सांगितलं हें त्यानं !" ती विषण्ण मुद्रेनें म्हणाली, " खरं पाहिलं तर त्यानं हें मला सांगायला पाहिजे होतं. नंदिनीबद्दलच्या कितीतरी गोष्टी त्यानं मला सांगितल्या—म्हणजे तिच्याविरुद्ध नव्हे ! फार आदर आहे त्याला तिच्याबद्दल—अगदीं देवतेइतका आदर आहे—मग हें कां सांगितलं नाहीं त्यानं ? कां चोरून ठेवलं माझ्यापाशीं ! आतां उद्यां विचारतें ."

त्याच वेळीं जाणें शक्य असतें तर ती गेली असती, इतकी ती उताविळ झाली होती. कोमल भावनांचा अंकुर उद्‌भवला होता. त्याला

पालवी फुटत होती.

"अलबत् विचार !" मी म्हटलें, "असल्या गोष्टी मनांत ठेऊं नयेत. मनांत आलं कीं बोलून टाकावं ! अशा कामीं जेव्हांचं तेव्हां निराकरण झालेलं बरं !"

" पण तुम्ही मला कांहींच सांगितलं नाहीं तात्या ! " असें जेव्हां तिनें मला सांगितलें तेव्हां तिची मुद्रा पालटली होती—मुळची आनंदी वृत्ती सुटून आली होती.

तिच्या त्या खेळकर प्रश्नाचं मलाही हंसूं आलें. " काय सांगायचं तुला ?" मी हंसत म्हटलें, " मला तरी कुठं धडसं माहीत होतं ! सारं कांहीं अचानक घडून आलं. "

तरीही तिनें आग्रह केला आणि तिच्याबरोबरच माझ्याही मनाचे समाधान व्हावे म्हणून, नंदिनीची पहिली भेट झाल्यापासूनची सारी हकी-कत मी तिला खडान्‌खडा सांगून टाकली.



# १३

कॅाँग्रेस हाऊसमधून चालणारे प्रकार जितके खळबळ उडविणारे होते तितकीच त्यांची योजना करणारांची तारीफ करण्याजोगी होती. कॅाँग्रेस बुलेटीन या नांवाचें एक पत्रक रोज मराठी, गुजराती व इंग्रजी भाषांतून निघत होतें. तें रोनिओवर छापलें जात असे. ते कुठें आणि कसें छापलें जातें याचा पत्ता पोलीसांना लागला नाहीं. किती वेळां तरी टाईप-रायटर वगैरे पकडले गेले पण इकडे छापा पडावा आणि लगेच दुसरीकडे बुलेटीन प्रसिद्ध व्हावें, असें झालें म्हणजे पोलीससुद्धां कावून जात असत. मुंबई पोलीससारख्या वाकबगार पोलीसांच्या नजरेंतून निसटून हें बुलेटीन चालू ठेवण्याचें जें धाडस करण्यांत आलें, त्यावरून शिस्तवार कामें करण्याची संवय कार्यकर्त्यां माणसांत आतां उत्पन्न झाली आहे असें माझ्या-सारख्या तटस्थ माणसाला देखील वाटूं लागलें.

या बुलेटीनच्या कारस्थानांत मधूचा हात असावा अशी मला शंका होती. अजून तिनें स्वयंसेविकेचा वेष धारण केला नव्हता. अगदीं विला-यती जरी नाहीं तरी तिच्या अंगावरचे कपडे गिरणींतल्या तलम काप-डाचे होते.

अलिकडे ती कॅाँग्रेस हाऊसकडे क्वचितच जात असे—पण कुठें-तरी बाहेर जात असे हें मी पाहात होतों—अगदीं वेळीं अवेळीं जात असे. भर मध्यान्ह रात्रीं मोटरचें हॅार्न वाजावें, तिनें झोपेंतून उठून त्यासरशीं निघून जावें, असें वारंवार होऊं लागल्यामुळें मी तिला अगदीं जपून विचारलें, तेव्हां ती म्हणाली, ' एवढं विचारूं नका तात्या, माझ्यावर

विश्वास ठेवा—"

मला साधारणपणें अंदाज आला, कीं हें या चळवळीतलें कांहींतरी कारस्थान आहे.

एकदां रस्त्यांतून जातांना मी पाहिलें. मधू अगदीं भडक पोषाक करून एका व्हिक्टोरियांतून जात होती. तिच्याबरोबर ज्या दोन बाया होत्या त्या फारशा सभ्य दिसत नव्हत्या—फारशा कां--उघड उघड त्या तिसऱ्या दर्जाच्या वेश्या दिसत होत्या. एक भली मोठी हार्मोनियमची पेटी त्यांच्याबरोबर होती.

मधूची आणि माझी दृष्टादृष्ट झाली. पण बुद्धिपुरस्सर तिनें ओळख दाखविण्याचें टाळलें.

ती आपण होऊन सांगत नाहीं तोंपर्यंत कांहीं बोलायचें नाहीं असें मी ठरवलें होतें. त्याच दिवशीं ती मला म्हणाली; " कांहीं दिवस तिकडे बंगल्यावर राहायला कां जात नाहीं तुम्हीं तात्या ?"

मी विचारलें " किती दिवस ?"

" कदाचित एकदोन दिवस–तर कदाचित् महिना पंधरा दिवस !"

" अगदीं गेलंच पाहिजे का ?"

" हो !" मधू अगदीं काकुळतीला येऊन म्हणाली, " एवढं माझं ऐकाच—मी सांगेपर्यंत इकडे येऊं नका !"

" ठीक आहे." असें मी म्हणतांच ती तीरासारखी धांवत सुटली.

मी होय म्हटलें खरें—पण होकार देण्यांत मी चूक केली कीं काय असें मला वाटूं लागलें.

मी बंगल्यावर राहायला गेलों. दोनतीन दिवस भानगड गल्लींत मुळीं आलोच नाहीं. कॉंग्रेस हाऊसकडेही गेलों नाहीं. एकदोन दिवसांत कॉंग्रेस हाऊस जप्त केलें जाणार अशी बातमी पसरली होती.

एके दिवशीं मी सहज घरीं आलों, पाहिलें तों दाराला कुलूप होतें. खालच्या बिऱ्हाडकरूनें मला हांक मारली. ते म्हणाले, "हल्लीं फार दंगा चालत असतो तुमच्या जागेत सारखीं गाणीं बजावणीं सुरू असतात. अगदीं सकाळपासून जी पेटी वाजायला सुरवात होते ती दुपारीं दोनतीन वाजेपर्यंत ! फार त्रास होतो आम्हांला ! याचा कांहींतरी बंदोबस्त करा."

भाडेकरूंची कशीबशी समजूत घालून मी काँग्रेस हाऊसकडे वळलों तिथें एकच गडबड उडाली होती. तिथलें सारें सामानसुमान लॉऱ्या भरभरून कुठेंतरी नेलें जात होतें.

विचारावें म्हटलें, तर ओळखीचा कुणी दिसेना. सगळेच गडबडींत होते. दररोजचें उत्साहाचें वातावरण कुठेंच दिसत नव्हतें. प्रत्येकजण कांहींतरीं काम करीत होता पण त्याचा चेहरा अगदीं काळवंडलेला दिसत होता.

इतक्यांत मला सुरेंद्र दिसला. त्याला मी थांबवून विचारलें. त्यानें एक क्षणभर थांबण्याविषयीं मला सांगितलें.

सुरेंद्राचा एक क्षण बराच वाढला. चांगला अर्धा तास मी वाट पहात राहिलों होतों.

तो जो आला तो मला घेऊन माझ्याच घरीं आला. दाराला कुलूप होतें तें त्यानें उघडलें. आंत येतांच त्यानें दाराला आंतून कडी लावली.

माझ्या घराची सारीच कळा बदलून गेली होती.

नाटकमंडळींतल्या एकाद्या खोलीचें स्वरूप इथें आलें होतें.

एकदोन पेट्या, एक तबला, एकादें फिड्ल, पडलेलीं दिसत होतीं. आंतल्या खोलीला कुलूप होतें.

मी इकडे तिकडे नजर फेंकली त्यावेळीं सुरेंद्र म्हणाला, "अजून कांहीं दिवस आपल्या या जागेची मला जरूर लागेल. जागा मोकळी होतांच मी बंगल्यावर येऊन तुम्हांला कळवीन—आज ना उद्यां केव्हां-तरी ही जागा मोकळी करावी लागणार यांत शंका नाहीं. जीव कसा वेडा-पिसा झाला आहे. आज कांहींच बोलतां येत नाहीं. तुमच्या घरांत आम्हीं मालकी गाजवतों आहोंत याची क्षमा करा"

"मधूला कांहीं धोका नाहीं ना?" मी आतुरतेनें विचारलें.

मला तेवढीच काळजी होती.

"छे छे! मुळींच नाहीं." तो म्हणाला, "पण नाहीं तरी कसं म्हणूं! आज कुणावर काय प्रसंग येईल हें कांहींच सांगतां येणार नाहीं. आज उद्यां काँग्रेस हाऊसदेखील हातचं जाणार!"

"ही पेटी तबला इथं कशाला?" मी विचारलें.

" सध्यां मला कांहींच सांगतां यायचं नाहीं. हा आडपडदा दूर झाला म्हणजे उद्यां सारं कांहीं तुम्हाला आपोआप कळेल."

आम्ही दोघेही जागेला कुलूप लावून खालीं रस्त्यावर आलों. मधूची भेट झाली नाहींच.

दुसऱ्या दिवशीं मला कळलें, कीं काँग्रेस हाऊस सरकारच्या ताब्यांत गेलें.

मी त्या बाजूला चक्कर मारून सहज पाहून गेलों. पोलीसांचा खडा पहारा काँग्रेस हाऊसच्या दारांत होता. एवढी गजबजलेली जागा—पण आतां तेथें प्रेतकळा आली होती. सारें वातावरण कसें भयानक दिसत होतें. खादीवाला म्हणायला आजूबाजूला कुणी फिरकत सुद्धां नव्हता.

बऱ्याच लोकांना तुरुंग पहावा लागला होता.

मी माझ्या घराकडे वळलों. पाहिलें तों तिथें दाराला कुलूप होतें. माझ्या छातींत धस्स झालें. मधूला तर पकडलें नाहीं ना ?

मी बंगल्यावर परतलों. मन अगदीं उदास झालें होतें. एवढा मोठा उपद्व्याप केला पण त्यांतून निष्पन्न काय झालें ? शेंकडों लोकांचीं डोकीं फुटलीं, हजारों लोक तुरुंगांत गेले, कितीतरी कर्तबगार माणसें आज तोंड लपवून राहिलेलीं—एका फटाक्यासरशीं सरकारनें सारी चळवळ हाणून पाडली.

मला प्रश्न पडला तो एवढाच, कीं खरोखरच चळवळ हाणून पाडली होती का ! नित्याप्रमाणें काँग्रेस बुलेटीनें येऊन माझ्या हातीं पडलीं.

क्षणभर मला आश्चर्य वाटलें—कौतुक वाटलें. पोलीसांच्या एवढ्या कडेकोट बंदोबस्तांतूनही अजून काँग्रेस बुलेटीन निघतें आहे ! त्या बुलेटीनमधें पकडापकडीची सर्व हकीकत दिली होती. एवढीं बंधनें निर्माण झालीं असलीं तरी बुलेटीन निघत राहाणार, अशी घोषणा केली होती.

मधूचा पत्ता नाहीं म्हणून मी अस्वस्थ झालों होतों. कुणाला विचारूं ? कुठेंन् कशी चौकशी करूं ? कुणीच मला कां विश्वासांत घेऊं नये ? मनाच्या या अस्वस्थतेमुळें पिंजऱ्यांतल्या वाघासारखा घरांतल्या घरांत येरझाऱ्या घालीत मी राहिलों. तोंच आणखी एक धक्का बसला—

पोलीसांची एक तुकडी एकदम येऊन बंगल्याची झडती घेऊं

लागली. मी मुळींच प्रतिकार केला नाहीं. बंगल्यांत आक्षिप्त असें कांहीं होतें कीं नव्हतें, हें मला तरी कुठें माहीत होतें? नंदिनी अव्यवस्थित नव्हती. तुरुंगांत जाण्यापूर्वीं तिनें सारीं कांहीं गाफमुफी करून ठेविली असेल असें मला वाटत होतें—आणि म्हणूनच मी प्रतिकार केला नाहीं.

पोलीसांनीं कानान् कोपरा धुंडाळून पाहिला पण त्यांना कांहींच सांपडलें नाहीं. अक्षिप्त समजलीं जाणारीं कांहीं पुस्तकें नंदिनीच्या संग्रहाला होतीं हें मला माहीत होतें, पण तीं देखील या झडतींत हातीं लागलीं नाहींत.

पोलीस तुकडी निघून गेली. त्यांनीं यथास्थित नासधूस मात्र केली.

मला वाटलें, शेवटीं मी एकटा तो एकटाच! लग्न झालें, बहिणीचें नातें जोडणारी एक प्रेमळ मुलगी घरीं आली, तिनें मला भलता लोभ लावला, त्या मोहांत मी संसारी झालों असें मला वाटलें—पण शेवटीं मी एकटा तो एकटा!

विचार करीत आराम खुर्चीवर अंग टाकून स्वस्थ पडलों होतों तोंच मला कुणाची तरी चाहूल लागली. डोळे उघडून पाहिलें तों समोर मधू उभी. माझ्या तोंडून उद्गार निघाला, " मधू, खुशाल आहेस ना?"

"भूक लागली आहे मला. कांहींतरीं खायला द्या!" मधू कोचावर अंग टाकून म्हणाली, "कालपासून मी उपाशी आहें."

स्वयंपाक्याला बोलावून मी तिच्यासाठीं जेवण तयार करायला सांगितलें. तोंपर्यंत चहा टोस्ट आणून तिला दिला.

यावेळीं तिच्या अंगावर खादी नव्हती. पूर्वींचे सारे तलम कपडे तिनें पुन्हां वापरले होते.

तिची मुद्रा उतरली होती खरी पण पावसाळ्यांतल्या सूर्याच्या किरणासारखी हास्याची लकेर चमकावीत ती म्हणाली, " तसं पाहिलं तर मोठी गंमत आहे. असले प्रकार परदेशी कादंबऱ्यांतून वाचीत होतें. पण हे लपंडाव खेळतांना भयंकर त्रास होत असला तरी देखील मोठा उत्साह वाटतो आहे. आट्यापाट्यांचा खेळ चालला आहे. पोलीस नुसती आंधळी कोशिंबिर खेळताहेत. आतांच पोलीसांनीं छापा घालून बुलेटीन काढण्याची सामग्री जप्त केली. मोठे खुषींत होते ते! एक तासाच्या आंत या छाप्याची हकीकत देऊन आम्ही बुलेटीन पोलीसच्या हातीं रुजू केलीं.

माठी गंमत आहे नाहीं ?"

तिची कळी खुलत चालली होती. तिला वाटणाऱ्या त्या गंमती जशा कांहीं तिच्या नजरेसमोर दिसत होत्या.

सारी हकीकत तिच्या ओंठावर नाचत होती. पण ती जिभेला लगाम घालते आहे, असें मला दिसून आलें.

"फार गंमत आहे तात्या !" मधू, उद्गारली "पण काय करूं आज मला कांहीं सांगता येत नाहीं. सारखी पळापळ—सारखी धांवा-धाव सुरू आहे. तसं पाहिलं तर पोलीसांची देखील सहानुभूती आहे आम्हांला—-ऑफिसरांची नव्हे—शिपायांची म्हणून येवढ्या उलाढाली करतां येताहेत ! ही अशिक्षित माणसं मोठी नेकीचीं ! काळीज असतं त्यांना. सुशिक्षित म्हणवणारे सारे स्वार्थी ! काय चाललं आहे ! असं सळसळून येतं आहे आंतून—पण कांहीं बोलतां येत नाहीं. कसं कुलूप बसलं आहे तोंडाला. कशी मी ही अशी झालें !—"

कोरड्या नजरेनें ती माझ्याकडे पाहात होती जरा कुठें खुट्ट झालें त्या सरशीं ती दचकून उठली. खिडकीचा दरवाजा किलकिला करून तिनें बाहेर पाहिलें. भिंगरी सारखी घरांतून एक चक्कर टाकून आली.

मी अगदीं स्वस्थ बसून राहिलों होतों. अगदीं स्थितप्रज्ञाची वृत्ती मला आली होती.

"मोठे धीराचे आहांत तुम्ही तात्या," माझ्या आराम खुर्चीच्या हातावर बसत ती म्हणाली, "तुमच्याकडे पाहिले, कीं मोठा धीर येतो. जिकडे तिकडे आग पेटलेली असतांना कसं स्वस्थ बसवतं तुम्हाला ?—"

तिच्या उद्गाराचें मला हसूं आलें तेव्हां ती म्हणाली, "तुम्ही हसतां आहांत ! धन्य आहे तुमची तात्या ! सारं कांहीं बदलून गेलं आहे. पूर्वी तुरुंगांत जाणं कठीण वाटत होतं— आतां तुरुंगाबाहेर राहाणं मोटं कठीण होऊन बसलंय् ! चळवळ तर चालू ठेविली पाहिजे ! आतां आम्ही जी कांहीं मुठभर माणसं शिल्लक राहिलों आहोंत त्यांतलीं चार दोन जरी तुरुंगांत गेलीं तर सारा डोलारा कोसळून पडेल. म्हणूनच ना खादी फेकून द्यावी लागली ?—कितीतरीं सांगावंसं वाटतं पण नाईलाज झाला आहे माझा !—" असें म्हणून ती उठून कोचावर आडवी झाली.

छताकडे डोळे लावून ती पडून राहिली होती. तिची विचाराची सांखळी तोडायचा मी प्रयत्न केला नाहीं.

चट्कन् उठून बसून माझ्याकडे पाहात ती हलक्या आवाजानें ह्मणाली " सुरेंद्राखेरीज दुसरा कुणी आला तर त्याला मी इथं आहें ह्मणून सांगू नका---मोठी खबरदारी घेतली पाहिजे. अगदीं थकल्यासारखं वाटतं आहे मला. "

जेवण झालें म्हणून सांगण्यांसाठीं स्वैपाकी आंत आला.

कसेबसे दोन घांस खाऊन ती नंदिनीच्या खोलींत झोपीं गेली. तिचा तो उत्साह, त्या उत्साहामुळें येणारा थकवा, त्या थकव्यानें आलेली तिची शैशवावस्था पाहून माझें हृदय भरून आलें.

मी माझें वय विसरून गेलों. वार्धक्यसुलभ वात्सल्याचा अंकुर माझ्या हृदयांत रुजूं लागला.



# १४

**त्या** दिवशीं मधू बंगल्यावर राहिली नाहीं. कुठें जातेस, काय करतेस, हें जसें मी यापूर्वी विचारीत नसे तसेंच याहीवेळीं विचारलें नाहीं. संशयानें संशय वाढतो तसाच विश्वासानें विश्वास दुणावतो, असेंच मला वाटत असतें.

बंगल्यात राहायला मी कंटाळलों होतों. लहान जागेंत राहायाची संवय असल्यामुळें ही अफाट जागा मला भकास वाटत होती. लहानशी खोली कुठेंच नव्हती. इथली बाथरूम माझ्या हॉल एवढी मोठी होती.

केव्हां एकदां माझ्या घरीं जाईन असें मला झालें होतें. पण अजून माझी जागा खाली झाली नव्हती. एकदोन दिवसांनी मधू मला भेटावयाला येत असें, तिच्या प्रकृतीवर चांगलाच परीणाम झालेला दिसत होता. त्याचीं कारणें मी तिला विचारलीं नाहींत किंवा तिनें मला ती सांगितलींही नाहींत.

एकदाची जागा खाली झाली आणि मी माझ्या घरीं जाऊन सुखाला लागलों. स्वैपाकी आणि गडी दोघेही निघून गेले होते. नवीं माणसें मिळे-तोपर्यंत डबा आणून भागवीत होतों. मधू रोज जेवायला येत असेच असें नाहीं.

दिवसें दिवस मधूची प्रकृति बरीच थकत चालली होती. मला तिची काळजी वाटूं लागली. हीं माणसें असें कोणतें काम करताहेत ?

रोज बुलेटीन्स निघत होती. मधून मधून पकडापकडी होत होती पण बुलेटीन्स निघणें थांबलें नाहीं.

एके दिवशीं सुरेंद्र आला. त्याचीही प्रकृती चांगली दिसत नव्हती. मी त्याला विचारलें तेव्हां तो म्हणाला, "अंधारांतले डाव कसे खेळायचे याचं शिक्षण सध्यां घेतों आहोंत. लवकरच तुम्हांला आणखी एकादी गंमत दिसेल. पोलीसांना कसं टेकीला आणलं आहे तें पाहातां आहांत ना? पुढल्या लढाईचे हे धडे आहेत. पण एकंदरीत ताण मोठा विलक्षण पडतो आहे यांत शंका नाहीं."

मी जास्त कांही विचारलें नाहीं आणि त्यानेंही सांगितलें नाहीं.

नंदिनीच्या शिक्षेची मुदत भरत आली होती. तुरुंगांत मी तिला भेटायला कधीच गेलों नाहीं. खुशालीचीं पत्रें येत होतीं एवढयावर समाधान मानीत होतों. जीं जीं पुस्तकें ती मागे तीं तीं पाठवीत होतों. तिच्या भेटीसाठीं मधूला पाठवावें असा एकदां विचार केला पण मधू जायला तयार होईना. तुरुंगातल्या राजकैद्यांशीं आपला लागाबांधा दिसूं नये, म्हणून प्रस्तुतच्या कार्याकडे पाहून तिला तिकडे जाणें इष्ट वाटलें नाहीं.

शेवटीं एकदाची नंदिनी आली. तुरुंगातून परत येणाऱ्या लोकांचीं पूर्वीं जी कौतुकें केलीं जात असत तो काल आज गेला होता. कोण सुटला आणि कोण राहीला याची फारशी वाच्यता होत नसे.

नंदिनी आली ती पहिल्यानें माझ्या घरींच आली. मधू त्यावेळीं घरींच होती म्हणून अंधारांतल्या मनोभावना आम्हांला मनातल्या मनांत ठेवाव्या लागल्या.

आम्हीं पतिपत्नी होतों पण त्या नात्याची प्रस्थापना झाली नव्हती. पूर्वी लहान मुलांची नव्हतीं का लग्नं होत—तसलंच हें एक लग्न होतें. मधू म्हणाली, "आज आतां तुमची वरात काढायला हवी. लग्नाच्या वरातीची संधी एकट्याएकट्यानेंच सांधलीस. तात्या बिचारे घरींच राहिले. आतां आज आपण एक मोठी वरात काढूं—"

अगदीं खिन्नपणानें हंसत नंदिनी म्हणाली, "ते वरातीचे दिवस आतां गेले मधू! आतां ज्या वराती निघायच्य त्या निराळ्याच प्रकारच्या!—" तिनें एक मोठा सुस्कारा टाकला. ती पुढें म्हणाली, "सारं कांहीं मला स्टेशनवरच कळलं. मला नव्हतं वाटलं!—शाबास मधू!—माझी जागा चालवलीस. मी असंच कांहीतरी आखलं होतं. कॉंग्रेस'

हाऊस जप्त होणार याची कल्पना आम्हांला होतीच आणि म्हणूनच आम्ही कांहीं कल्पना आंखल्या होत्या—त्या आमच्या योजना होत्या–काँग्रेस-वाल्यांच्या नव्हत्या. त्या योजना अंमलांत आणल्या म्हणून काँग्रेसची अब्रू टिकून राहिली. आतां एकदां सर्वांच्या गांठी भेटी घेतल्या पाहिजेत. आणखी कांहीतरी केलं पाहिजे. आतां कोण कोण बाहेर आहेत?"

मधूनें तिच्या कानाशीं लागून बोलायला सुरवात केली. मी मुद्दाम दूर होऊन, जाऊन खिडकींत उभा राहिलो. मधू जसजशी बोलत होती तसतशी नंदिनीची मुद्रा खुलत चालली होती.

बोलणं संपतांच तिनें 'शाबास मधू' असें म्हणून उठून तिला कडकडून मिठी मारली.

माझ्या आंगावर रोमांच उभे राहिले! हें कुणाचं भाग्य? कुणी कुणाचें भाग्य चोरलें? आणि तें कां! मला वाटलें, नंदिनी आली त्यावेळीं मधू घरीं नसतां तर?

"थांबा जरा, जाऊन येतें" नंदिनी मला म्हणाली. मधूनें तिला अडवलें.

"नाही," मधू म्हणाली, "तूं तिकडे जाणं इष्ट नाहीं. दीक्षीत आणि मेनन आपली पराकाष्ठा करताहेत खरं पण ते देखील आज उद्यां पकडले जातील अशी भीति आहे. मीच जाऊन येतें—" असें म्हणून ती घाईघाईनें निघून गेली.

आतां मोठा कठीण प्रसंग होता. लग्नविधी झाल्यानंतर पती आणि पत्नी या नात्यानें आमची ही पहिली भेट. आम्ही दोघेंही अस्वस्थ झालों होतों.

आम्ही दोघें एकमेकांसमोर उभे राहिलों. अगदीं नकळत—अगदीं सहजासहजीं आम्हीं एकमेकांचे हात धरले नंदिनीच्या डोळ्याच्या पापण्या ओल्या झाल्या होत्या.

"आज आपली ही पहिली भेट!" नंदिनीच्या तोंडून उद्गार निघाले, "तुरुंगांत असतांना मी सारखी विचार करीत होतें—माझ्या गळयांतलं मंगळसूत्र पाहिल्यामुळं कित्येकींनी मला विचारलं—मी सांगितलं—कधींच तूं भेटायला आला नाहींस म्हणून सर्वांनाच आश्चर्य वाटत

होतं--" त्याक्षणीं ती क्षणभर थांबली—तिला काय वाटलें हें जाणण्याची मला उत्कंठा होती म्हणून मी बोललों नाहीं--इतक्यांत ती म्हणाली, " मला आश्चर्य वाटलं नाहीं. उलट समाधानच वाटलं. आतां आपण भेटतों आहोंत !--"

आम्ही भेटलों का ?

हृदयमीलनाचा तो अननुभूत आनंद !--क्षणभर मी भान विसरलों.

आम्ही कोचावर बसलो--अगदीं जवळ जवळ बसलों. एवढंसुद्धां अंतर नव्हतें दोघांमध.

"आतां आपण संसार थाटणार !" ती माझ्याकडे पाहात उद्गारली, "कांहीतरी विलक्षण गोष्ट करणार आहोंत आपण. दोघांचे दोन संसार--दोघांनीहा आळीपाळीन चालवायचे ! मोठी गंमत होईल नाहीं !"

काय बोलावें हें मला अजून सुचत नव्हतें. संसारी वृत्तीला पराङ्मुख असलला मी असा कसा वेडा झालों ?

ती बोलत होती, " काय ? मी बोलतें आहें तें ऐकूं येतंय ना ?"

" नुसते डोळे राहिले आहेत मला. डोळ्यांनीं ऐकतोय्—"

मी दचकलों. ती तंद्रा भंग पावली. मी म्हटलें, " या संसाराला सुरवात कुठं करायची ? इथं किं तिकडे-बंगल्यावर ?"

" अर्थात् इथं-वरगृहीं ! मधूला देऊं पाठवून तिकडे "

आम्ही दोघेंही खूप खूप हंसलों. कां हंसत होतों आम्हीं ? काय झालें होतें असें हंसण्याजोगें ? मला वाटलें, आमच्या संसाराची सुरवात हंसत खेळत होते आहे. हा हंसरा खेळ असाच टिकणारा का ?

नंदिनी चोंहींकडे पाहात होती. ती म्हणाली, " बरीच अदलाबदल केली पाहिजे इथं. हा ब्रह्मचाऱ्याचा आश्रम आतां बदलून टाकला पाहिजे."

" नाहीं, तूं आतां सासरीं आहेस. माहेरची उसनी श्रीमंती इथं नको यायला. माझं हें दारिद्र्य असेल-तुझ्या तुलनेनं दैन्य असेल-पण साम्यवादाचा हा पहिला धडा तुला माझ्या घरीं-आपल्या घरीं घेतला पाहिजे—"

नंदिनी गंभीर झाली असें पाहून मी म्हटलें, "भ्यालीस? मग तुरुंगांत कशाला गेली होतीस? नाहीं सवय झाली तिथं—"

"छे छे, मी हा अविचार कां केला आहे? तुरुंगांत गेलें नसतें तरी सुद्धां भ्यायलें नसतें. तुरुंगाच्या मानानं पाहिलं तर हीं इथं चैन आहे! तसं नव्हे–तुला कळलं नाहीं–ही सिंगल कॉट बदलली पाहिजे—" पुन्हा आम्ही दोघेंही हंसत सुटलों. मला तर माझें हंसें आवरत नव्हतें. कसें माझ्या लक्ष्यांत आलें नाहीं? मी म्हटलें, 'आजचा दिवस' शय्या भूमितले '—"

"पण त्यापूर्वी–" नंदिनी मला दटावीत म्हणाली, "पण त्यापूर्वी एक महत्वाची गोष्ट–आली का ध्यानांत?—" असं म्हणून ती माझ्या कानाशीं लागली.

भटवाडी कांहीं फारशी दूर नव्हती म्हणून मोटार तिथेंच ठेवून आम्हीं पायींपायींच निघालों. त्यापूर्वी आम्ही बरोबर पायीं हिंडत होतों पण त्या दिवसाचें हातांत हात घालून जाणे ही एक नवीच अनुभूती होती. दोघांनाहीं ती जाणवत होती.

आम्ही कर्व्यांकडे आलों. त्यावेळीं विषयाचा उपक्रम कसा करावा तें दोघांनाही सुचेना. कर्व्यांनीं बरोबर ताडलें. त्यांनीं विचारलें, "कव्हां लग्न झालं तुमचं? आजच तर नव्हे?"

"तसंच म्हणा ना." नंदिनी अवसान आणून म्हणाली, "लग्न-विधी झाला फार दिवसांपूर्वी–पण विधी झाला त्याच क्षणाला मला तुरुंगांत जावं लागलं. आज सुटून आलें. तसं पाहिलं तर हा आजचाच पहिला दिवस!"

एवढं बोलायचा कसा धीर झाला हिला. लाजवट कोण! पुरुष कीं स्त्री?

थोडा वेळ विचार करून कर्वे म्हणाले, "मला वाटतं, तुम्हाला आधीं डॉक्टरकडे जावं लागेल—" मी घाबरून गेलों. माझा घाबरेपणा माझ्या मुद्रेवर दिसून आला तो पाहून कर्वे मला म्हणाले, "तुम्हाला नाहीं—यांना!" असें म्हणून त्यांनीं डॉक्टरकडे कां जायचें त्याचा कार्य-कारणभाव आम्हाला विशद करून सांगितला.

विषय नाजूक खरा पण त्यांनीं इतक्या मोकळ्या मनानें, इतक्या शास्त्रीय भाषेंत सर्व कांहीं सांगितलें, कीं आम्हाला तें ऐकतांना एवढा सुद्धां संकोच वाटला नाहीं. यापूर्वी कर्व्यांबद्दल माझा थोडा गैरसमज होता. राईट एजन्सीचें कार्य ते अगदीं प्रांजलपणें करीत आहेत अशी माझी त्यावेळीं खात्री झाली.

आम्ही घरीं परत आलों तेव्हां मधू आली होती. गडी आणि आचारीही हजर झाले होते.

कांहीं वेळ नंदिनीनें मधूला बाजूला घेतलें. बराच वेळ दोघींचीही खलबतें सुरू होतीं.

मी आपल्याच विचारांत मग्न होतों.

माझ्या आयुष्यांतील त्या महत्वाच्या दिवशीं मी माझा संसार थाटला.

—:o:—

# १५

दुसऱ्या दिवशीं मधू नंदिनीच्या बंगल्यावरून परत आली त्यावेळीं उन्हें चांगली वर आलीं होतीं. आम्ही पहिलाच चहा घेण्याच्या तयारींत होतों. मधूला पाहातांच मला थोडीशी भीती वाटली—म्हटलं, पहिल्यच दिवशीं भलतीच कांहीं तरी थट्टा नको.

खरोखरच्च मधूचें मला कौतुक वाटलें. आमच्या मुद्रेवरून तिनें ताडलें असावें—थट्टा करण्याचा प्रयत्न तिनें केला नाहीं.

चहा होतांच तिनें नंदिनीला बाजूला घेऊन कालच्यासारखेंच खल-बत करायला सुरवात केली. नाकबूल कशाला करूं ?—पण मला जरा वैषम्य वाटलेंच. यानीं मला असें कां दूर करावें ? असतील राजकारणें — पण मी त्यांचे कट फोडायला कुठें जाणार होतों ?

मधू आणि नंदिनी पुन्हां येऊन बसल्या त्यावेळीं त्यांनीं कसलाच उल्लेख केला नाहीं असें पाहून मी मधूला विचारलें, “ सुरेंद्र कुठं आहे ! ”

“ खुशाल आहे. ” मधू म्हणाली, “ पण कुठं आहे तें सांगतां येत नाहीं. उमाशंकर दिक्षीत आणि मेनन यांना पकडल्यापासून त्याला बरीच खबरदारी घ्यावी लागते. अजून अच्युत पटवर्धन बाहेर आहेत-- पण तुम्हाला तीं माणसें काय माहीत म्हणा—केव्हां तरी संधी साधून सुरेंद्र भेटत होते—”

मधूची बदललेली वृत्ती पाहून मला कौतुक वाटलें. कोणत्या उद्दे-शानें आपण मुंबईत आलों याची तिला आठवणसुद्धां राहिली नव्हती,

इतकी ती या प्रकरणांत रंगून गेली होती.

"तोंड बांधून बुक्क्याचा मार झाला आहे!" नंदिनी म्हणाली, "जिव्हाळ्याच्या माणसांना भेटतांसुद्धां येत नाहीं. आजवर हीं कारस्थानें कादंबऱ्यांतून वाचित होते पण आतां प्रत्यक्ष त्या परिस्थितींत वावरतांना तीं वर्णनें फिक्की वाटूं लागतात. पूर्वीं क्रांतिकारकांच्या बाँबच्या भानगडी सुरू होत्या, त्यांचं लोकांना कौतुक वाटत होतं. पण नुसतं एक काँग्रेस बुलेटीन काढणं हें आज बाँबपेक्षांही भयंकर होऊन बसलं आहे—"

नंदिनी बोलत होती—मी गंभीर होऊन ऐकत होतों—पण ऐकतां ऐकतां मधूच्या चेहऱ्याची कळी खुलत जात होती. नंदिनीचें भाषण मधेंच तोडून ती म्हणाली, "मग आतां कसं काय ठरलं? शुक्रवारपर्यंत इथं—अन् शनिवारीं बंगल्यावर जायचं तुम्हीं, अन् इथं राहायला यायचं मी—असंच ना?"

आम्ही दोघेंही नुसतीं हंसलों तेव्हां मधू म्हणाली, "हंसायला काय झालं? आतां या दोन संसारांची मुकादमी करावी लागणार आहे मला. तुम्हाला काय, तुम्ही इकडे याल आणि तिकडे जाल—पण मला चालवावा लागणार आहे सारा संसार! दुसरं कुणी असतं तर हनीमून-साठीं गेलं असतं दार्जिलींगला नाहीं तर ऊटीला—पण तुमचा हनीमून चालला आहे इथं भानगड गल्लींत. अन् मला एकटीलाच सटवाईसारखं जाऊन पडावं लागतं आहे त्या मलबारहिलच्या मसणवटींत. काय भकास आहे तो बंगला! घर नुसतं खायला येतं. रात्रींच आले असतें पळून—पण तुम्हां वडील माणसांचं कल्याण पाहिलं पाहिजे ना मला!—कां? बोलत कां नाहीं?"

आम्ही दोघेंही गंभीरपणें बसलों होतों. मधूला थट्टेची लहर आली आहे हें आम्हाला दिसत होतें आणि म्हणून आम्ही तिला चांगलीच खिजवायची असें न बोलतां ठरवलें होतें.

"बरं, बरं," मधू म्हणाली, "तुम्ही फार सभ्य झालां आहांत दोघेही. पाहीन हा सभ्यपणा किती टिकतो तें—"

खालीं मोटारचें शिंग वाजलें. खिडकींतून डोकावून न पाहातां मधू दाराशीं गेली. सुरेंद्र दाराशीं दिसला. एक क्षणभर मधूच्या कानाला

लागून तो आंत आला.

"अशी ग्लानि आली आहे !" कोचावर आंग टाकीत तो म्हणाला, "पण योजलेलं काम तडीला नेलं पाहिजे. कल्पना अचाट आहे, पण यशस्वी झाली तर सर्वांना थरारून सोडील. ही कल्पना अमलांत येईपर्यंत अच्युतराव पटवर्धन तेवढं बाहेर राहिले पाहिजेत. खेतवाडी तुळशी बिल्डींगमधे ठेवलं आहे त्यांना—आणखी तिघे आहेत बरोबर. चौघेही एकावेळीं बाहेर जाऊं नका म्हणून सांगितलंय—"

"पुरे झालं !" मधू त्याला दटावून म्हणाली "बायकांच्या पोटांत कांहीं राहात नाहीं, असा आरोप करतात लोक—पण इथं या पुरुषाचचं तोंड कसं सुटलं आहे पहा !"

"काय बिघडलं त्यांत ?" मी जरा रागानेंच म्हटलें, "मी पोलीसांचा टेहळ्या का आहे ?"

"खरं आहे मधूचं म्हणणं !" नंदिनी म्हणाली "भिंतीला सुद्धां कान असतात. वाऱ्यावरसुद्धां विश्वास ठेवतां येत नाहीं हल्लीं. काय करायचं तें विचार करून करा सुरेंद्र. तुरुंगात जाणं सोपं आहे—पण सध्यांचा काल असा आहे, तुरुंगाच्या बाहेर राहाणंच मोठं कठीण आहे. मोठी बिकट आहे ही वेळ. चळवळ थांबता नये—पिकेटिंग थांबता नये—बुलेटीन तर मुळींच थांबता—नये अन् हें तुमचं जें कांहीं अचाट व्हायचं आहे तें तर मुळींच फसतां नये !"

सुरेंद्र अगदीं ओशाळला आणि म्हणाला, "उल्हासाच्या भरांत बोलून गेलों खरा—इथं कोणी परकं नाहीं हेंही खरं, पण या गोष्टी एवढ्या मोठ्यानं बोलायला मी नको होतं. यापुढं नाहीं होणार असं."

सुरेंद्रानें अशी नांगी टाकलेली पाहून मला एकंदरीत बरें वाटलें नाहीं.

त्या दिवशीं संध्याकाळीं मधू एक रेडीओ सेट घेऊन आली. एका कार्डबोर्डावर लायसन्स चिकटवून जवळच तिनें टांगून ठेविलें. मी विचारलें तेव्हां ती म्हणाली, "मला करमणूक पाहिजे कांहीं तरी—"

"पण मला नको आहे ती कटकट !" मी म्हटलें, "सुखानं वाचता देखील यायचं नाहीं हा रेडीओ सुरूं झाला म्हणजे."

" असेना का " नंदिनी म्हणाली " तिची हौस आहे तेवढी सुद्धां नको का पुरवायला ?"

मी उगीच राहिलों असें पाहून मधू माझ्या अगदीं जवळ आली आणि माझे दोन्ही हात आपल्या हातांत धरून म्हणाली, " असं पहा तात्या, तुम्हांला त्रास होईल या रेडीओचा, हें मला माहीत आहे, पण मला तो हवा आहे. करमणुकीसाठीं तो नव्हे–कौतुकासाठीं नव्हे–मला संध्याकाळीं आठ वाजतां बातम्या सांगतात त्या ऐकायच्या आहेत. साडेसात पासून साडेआठ पर्यंत सुरू असला कीं माझें काम झालें. रागवायचं नाहीं बरं !—" असें म्हणतांना तिनें असा कांही चमत्कारिक चेहरा केला कीं मला हंसूंच कोसळलें.

" काय व्रात्य कारटी आहे " मी उद्गारलों " आतां रेडिओंतल्या बातम्या ऐकून राजकारण करणार आहे ही एवढीशी पोर ! "

नंदिनी मोठ्या पोक्तपणानें हंसत होती. दोघींनी एकमेकांना डोळा घातला–मला संशय आला. दोघीही मला बनवताहेत ! मी म्हटलें " लग्न करून काय फायदा ! अजून हा आडपडदा आहेच. आम्ही दोघं पतिपत्नी–पण ही माझी लग्नाची बायको खलबत करते आहे कुठल्या तरी एका पोरीबरोबर ! बरं, ती तरी जुन्या ओळखीची म्हणावी तर तेंही नाहीं. कुणी सांगावं, पोलीसांनीं सुद्धां पाठवली असेल हिला–हिच्यावर विश्वास ! अन् मी लग्नाचा नवरा परका ! असा परकीपणा दाखवायचा नंदिनी तर या मधूशींच कां नाहीं केलंस लग्न ! पुन्हां बायका बायकांचं चांगलं जुळतं–पदोपदीं आम्हां पुरुषांना टाकतां वाळींत–मग तुम्हीं बायकाच कां नाहीं करील आपसांत लग्न ? "

" There you are " मधू म्हणाली, " बरं कां नंदूवहिनी, तात्यांची Sense of humour जागी होऊं लागली आहे–आतां माणसांत येऊं लागले आहेत तात्या ! आतां मलासुद्धां वाटूं लागलंय कीं लग्न करावं ! "

" मग आहे कीं सुरेंद्र ! " मी डोळे मिचकवीत उद्गारलों.

" तात्या ! " मधू केवढ्या तरी मोठ्यानें ओरडली मी दचकलों–

दबकलों—अगदीं शरमिंदा झालों. मला वाटलें, थट्टा करण्याचें काम माझें नव्हे.

कडेविकडेला गेलेली चीड एका क्षणांत ओसरली आणि मधू मोठमोठयानें हंसूं लागली. ती हंसत हंसत म्हणाली " काय घाबरलांत तात्या! माझ्या दरडावणीला एवढे भितां, अन् उद्यां पोलीसांनीं जर तंबी दिली तर काय कराल? काय चेहरा पाडलांत! अन् असला हा बावळट नवरा तुला पसंत पडला नंदूवहिनी?"

नंदिनी कांहींच बोलली नाहीं. मधूच्या वृत्तीचें मात्र मला मोठें कौतुक वाटलें. ही एवढीशी पोर—मनावर केवढा ताबा ठेवते आहे!

त्या दिवशीं जेवणें होतांच मधू आम्हांला न सांगताच बंगल्यावर गेली.

———

# १६

दुसऱ्या आठवड्यापासून आमच्या राहणींत बदल झाला. दरिद्र्यांतून वैभवांत प्रवेश करावयाचा होता.

तसें पाहिलें तर मी कांहीं अगदींच दरिद्री नव्हतों. मध्यम वस्तींतील पांढरपेशाच्या नजरेनें मी श्रीमंतच समजला गेलों असतों. नोकरी केल्याशिवाय मला जगतां येत होतें-माझें मुंबईंत स्वतःचें घर होतें-घराच्या भाड्यांतून माझा चरितार्थ चालत होता, नव्हे चैन चालत होती; पण नंदिनीच्या वैभवाशीं तुलना करतांना मात्र मी दरिद्री होतों. तिच्या बंगल्यांतील फर्निचरच्या किंमतींत माझें अर्धें घर विकत घेतां आलें असतें !

आणि म्हणूनच मला हा राहणींतील बदल जाणवला. यापूर्वी या बंगल्यांत मी जात असें तो पाहुणा म्हणून ! आज मी कोणत्या नात्यानें जात होतों ? मालक म्हणून का ? पाहुणा म्हणून तर नव्हेच नव्हे ! मालक नाहीं आणि पाहुणाही नाहीं, असें विलक्षण नातें होतें.

पूर्वीं घरजांवई घेतले जात असत-तसेंच कांहींसें हें होतें. कांहींसें कां ? सासऱ्याची सत्ता नव्हती एवढेंच-एरवीं मी घरजांवई या नात्यानेंच इथें पाऊल टाकीत होतें-बारमहाचा नव्हे, हप्तेबंदीचा घरजांवई !

मी नंदिनीला तसें म्हटलें तेव्हां ती गंभीर झाली. पण मधू मात्र मोठमोठ्यानें हंसत सुटली. ती म्हणाली, " अन् मी हप्तेबंदी पाठीराखीण का ? तुमच्या या भानगडींत माझी उगीच नाचवानाचव चालली आहे-"

" कशाला नाचवानाचव करतेस ? " नंदिनी म्हणाली. " तूं

बारमहाचीच इथं राहात जा. इथं कांहीं तशी गैरसोय नाहीं. किती तरी खोल्या न् दिवाणखाने मोकळे पडले आहेत या बंगल्यांत."

"असं कधीं झालंय् ?" मधू म्हणाली, "मी तात्याकडे राहायला आलें आहे. माझ्या वडलांनीं मला इथं पाठवलं तें तात्याकडे राहाण्यासाठीं ! घरोबा आहे तो आमचा आणि तात्यांचा. तसं पाहिलं तर तुझा आमचा काय संबंध ? मी हा पत्ता बाबांना कळवला तर ते बिचारे घाबरून जातील. मलबार हिलच्या बंगल्याचा पत्ता ! छे, नाहीं ग बाई ! आमची आपली ती भानगड गल्लीच बरी ! तात्या येताहेत इथं-काय करतील बिचारे ! मालकाचा हुकूम पाळला पाहिजे ना ?"

"मी मालक का पोरटे ?" नंदिनी म्हणाली.

"तर काय ?" मधू पोक्तपणाचा आव आणीत म्हणाली, "नवरा या नात्यानें यांनीं नोकरी पत्करली आहे—"

"गप्प बैस !" नंदिनी ओरडली "भलतंच कांहीं बोलूं नकोस."

"भलतंच कसं ? नोकर असल्याशिवाय काय असे दर आठ-ड्याला जागेपालट होत असतात ?—"

"हा आमचा एक प्रयोग आहे."

"प्रयोगाच्या नांवाखालीं पुरुषाला वठणीवर आणायचं हा तुझा उद्योग आहे नंदूवहिनी ! उगीच आडवळणं कशाला घेतेस ? तुमचं काय म्हणणं आहे तात्या ?"

मी दचकलों. प्रश्न अनपेक्षित होता. पण अप्रस्तुत नव्हता. मधूच्या म्हणण्यांत कांहीं तथ्य होतें.

"तुला हें कळायचं नाहीं." मी वडीलकीच्या अधिकारानें म्हटलें, "खरोखरच हा एक प्रयोग आहे. श्रीमंती आणि गरीबी याचा आलटून पालटून अनुभव घेतांना परस्परांना काय वाटतं हें पाहायचं आहे आम्हांला. नंदिनी आज सत्याग्रही झाली असली तरी मूळ साम्यवादी आहे—त्या साम्यवादाचा हा प्रयोग आहे."

"या साम्यवादाचा आतां अभ्यास केला पाहिजे मला !" मधू गंभीरपणें म्हणाली.

"हें पहा मधू," नंदिनी तिला कुरवाळीत बोलूं लागली, "आधीं

आपला सायन्सचा कोर्स पुरा कर नी मग साम्यवादाचा अभ्यास कर. फार महाग गेला आहे हा अभ्यास मला. जें मनाला पटतं, बुद्धीला पटतं. तेंच व्यवहारांत नडतं. मनाच्या बोलीचा मंत्र व्यवहारी बुद्धीला फुंकर घालून गप्प बसवतो. हा तुरुंगाचा अनुभव घेतला नसता तर पुष्कळच गोष्टी मला कळल्या नसत्या. मुंबईबाहेरचे लोक अजून साम्यवादाच्या गोष्टी बोलूं लागले नाहींत—नुसती साम्यवादाची चुणूक ऐकताहेत. खरी जरूरी आहे साम्यवादाची ती मुंबईसारख्या गडजंग शहरांत. आधीं हें मुंबईचं पुस्तक वाचायला शीक—चांगलं हजम करून घे आणि मग साम्यवादाच्या गोष्टी बोल. मोठा कठीण जातो आहे हा साम्यवाद मला!" असें म्हणून नंदिनी विषण्ण मुद्रेनें जमिनीकडे पाहात दोन्ही हातांत आपलें डोकें धरून बसली.

मधू धांवतच तिच्याजवळ गेली आणि तिच्या गळ्यांत हात टाकून म्हणाली, "तुला वाईट वाटलं वहिनी? माफ कर मला! पण मनांत आलं तें बोलल्याशिवाय मला बरं वाटत नाहीं. हा प्रयोग आहे हें मीसुद्धां कबूल करतें—पण काय निघणार या प्रयोगांतून?"

"तेंच मला पाहायचं आहे!" मधूला कवटाळीत नंदिनी म्हणाली.

—नंदिनीच्या डोळ्यांत आसवं आलीं होतीं. मधूचा चेहराही अगदीं उतरला होता. मला तें पाहावलं नाहीं. मी म्हटलें, "हें पहा मधु, भलत्याच कल्पना उभारूं नकोस. मलासुद्धां श्रीमंतीचा अनुभव घ्यायचा. चार घडींची ही उसनी श्रीमंती माझ्या मनावर काय परिणाम करते तें मला पाहायचं आहे. या बाबतींत यापुढें तूं बोलत जाऊं नकोस. त्यामुळें विक्षेप होतो या प्रयोगांत!"

"मोठा आजोबाचा आव आणला आहेस." मधू मूळपदावर येऊन म्हणाली, "चारदोन वर्षांच्या फरकाचें वडीलपण तुम्ही लोक गाजवू पाहातां माझ्यावर, पण मी तुमच्यापेक्षांही वडील आहे. पाहीन बरं, पाहीन! मलादेखील प्रयोग करतां येतील म्हणा. पाहीन, पाहीन; अन् फूटपाथवरच्या पाटीवाल्याशीं करीन लग्न!—पण तो माझा प्रयोग जेव्हां सुरू होईल त्यावेळीं तुम्हीच काय, सारं जग थक्क होऊन जाईल."

विषादाची छाया एका क्षणांत नाहींशी झाली. फुटपाथवरच्या पाटीवाल्याशीं लग्न केल्यावर मधूचा संसार कसा थाटला जाणार, याची विनोदात्मक चित्रें आपापल्या कल्पनेप्रमाणें आम्ही जसजशीं रेखाटूं लागलों तसतसे हास्याचे फवारे उसळून उठूं लागले.

मधू माझ्या घरीं निघून गेली. ती निघून जातांच माझें मन जरा अस्वस्थ झालें. पुन्हां माझी परिस्थिती मला जाणवूं लागली.

आपलेपणाच्या भावनेनें वागण्याचा मी प्रयत्न करीत होतों खरा, पण त्या पहिल्या दिवशीं तरी 'पाहुणेपणा' मला जाणवत होता. अगदीं तीक्ष्ण नजरेनें नंदिनी माझी हालचाल अजमावीत होती.

प्रत्येक राहाणींत—प्रत्येक ठिकाणीं श्रीमंती जाणवत होती. तिथेंही आचारी होते, इथेंही होते. आमचा आचारी अगदीं मोकळेपणानें बोले पण इथला आचारी यंत्रासारखा वावरत होता.

आम्ही टेबलावर बसून जेवलों, त्यामुळें आपण एकाद्या हॉटेलांत जेवतों आहोंत कीं काय असा मला भास झाला. जेवण होतांच त्याच जागीं गडी तस्त घेऊन आला आणि त्यानें आंचवण्यासाठीं आमच्या हातावर पाणी घातलें.

गोष्ट क्षुल्लक खरी पण तीमुळें आपलेपणांत विक्षेप आला असें मला वाटलें.

दुपारीं नंदिनी बाहेर गेली होती. मी घरींच राहिलों होतों. संध्याकाळीं नित्याप्रमाणें फिरायला जाण्यापूर्वीं, आम्ही दोघेही भानगड गल्लींत गेलों.

दाराला आंतून कडी होती. बेल वाजवली तरी दार उघडायला मधूनें बराच वेळ लावला. दार उघडण्यापूर्वीं आंत चाललेला खडबडाट मला ऐकूं आला. मला वाटलें, तिनें कांहीं तरी वस्तू कुठें तरी लपवून मग दार उघडलें

आंत प्रवेश केला त्यावेळीं मला चुकल्याचुकल्यासारखें वाटलें. असें काय झालें हें !—माझ्या घरीं मीच पाहुणा झालों का? मधूनें आमचें स्वागत केलें त्यावेळीं तो अयाचित पाहुणेपणा मला चांगलाच जाणवला.

मला एकटा टाकून त्या दोघी बाजूला जाऊन कुजबुजूं लागल्या.

मी चौफेर नजर टाकीत होतों. माझा मलाच परकेपणा वाटत होता. आचाऱ्यानें चहा आणून दिला तोदेखील एखाद्या पाहुण्याला आणून द्यावा तसा !

कौतुकाची लहर माझ्या हृदयांत उठूं लागली. विषाद त्या लहरीनें धुवून टाकला.

मला तिथेंच ठेवून त्या दोघीही मोटर घेऊन निघून गेल्या मी एकटाच बसून राहिलों. इकडलें तिकडलें पुस्तक उचलून चाळायचा मी प्रयत्न करीत होतो पण चित्त स्थिर होईना.

घरांत गडी वावरत होता—आचारी त्याला तंबी देत होता—दोघांची खटकाखटकी सुरू होती. पण आज मी त्यांना गप्प बसायला सांगितलें नाहीं.

कां ? तेही माझी खिजगणती धरीत नव्हते.

थोड्या वेळानें दोघीही परत आल्या तेव्हां मधू त्यांच्या आंगावर ओरडली तसे ते आपोआप गप्प बसले.

मला प्रश्न पडला, या घराचा मालक कोण ? मी की मधू ?

नित्याप्रमाणें आम्ही फिरून आलों. मधू आमच्याबरोबर नव्हती.

श्रीमंतांच्या संसारांतली ही पहिली रात्र मलबार हिलवरच्या बंगल्यांत आरामांत व्यतीत केली.

---

# १७

ऐषआरामाच्या दृष्टीनें तो आठवडा, खरें पाहिलें तर, मला सुखाचा गेला पाहिजे होता. पण मनावरचा परिणाम मला तें सुख लाभूं देईना.

हें वैभव खरें पण तें माझें नव्हे—माझ्या पत्नीचें असलें तरी माझें नव्हे—अशी शंका माझ्या अंतरंगांत उठली. हा पाहुणचार तर नव्हताच नव्हता पण आपलेपणाची भावना त्या संसाराच्या चौकटींत कांहीं केल्या बसत नव्हती. अस्वस्थपणांत तो आठवडा मी घालवला.

ही गोष्ट नंदिनीच्या लक्षांत आल्यावांचून राहिली नाहीं. माझ्या प्रत्येक हालचालीचें ती बारकाईनें निरीक्षण करीत होती—जणूं काय माझ्या नाडावर हात ठेऊन माझी नाजूक प्रकृति ती अजमावीत होती.

खरें पाहिलें तर आम्हीं एकमेकांनीं आपलीं मनें एकमेकांपुढें मोकळेपणानें बोलून दाखविलीं पाहिजे होतीं—पण तसें कांहीं झालें नाहीं एवढेंच नव्हे, पण तसें कांहीं न झाल्याची तक्रार करण्याचें धैर्य कुणीच दाखविलें नाहीं.

या आठवड्यांत मधू फारच क्वचित भेटली. अच्युतराव पटवर्धन प्रभृति मंडळी पकडली गेली होती. सुरेंद्र निसटला तो केवळ योगायोगा-मुळेंच. नंदिनीनें मात्र या आठवड्यांत चळवळीच्या कामीं कोणताच भाग घेतला नाहीं.

मी माझ्या घरीं आलों त्यावेळीं मात्र माझ्यानें राहावेना. त्याला कारणही झालें. या मुक्कामासाठीं भल्या मोठ्या स्प्रिंगच्या गाद्या आणि

परांच्या उशा नंदिनीनें आणून ज्यावेळीं इथें टाकल्या, त्यावेळीं मी तिला अगदीं कठोरपणें विचारलें, तेव्हां ती म्हणाली, " तुरुंगांत होतें त्यावेळीं ही कैद आहे ही मला जाणीव होती. म्हणूनच तिथं गादीची जरुरी भासली नाहीं. आतां मी घरीं आहें—आतां काय म्हणून हाल काढूं ?"

" तूं चुकतेस नंदिनी." मी अगदीं भीत भीत पण अधिकारपूर्ण वाणीनें बोलायला सुरवात केली, " तूं घरीं आहेस हें खरें आहे पण या गाद्या गिरद्या मात्र या घरच्या नव्हेत. अगदीं प्रपंचाच्या दृष्टीनं मी पाहात नाहीं—पण आपण ठरवलं आहे त्याचप्रमाणं वागलं पाहिजे. तिकडल्या गाद्या इकडे आणायच्या तर तिकडेच राहिलेलं काय वाईट ? तुरुंगांत एवढे हाल काढलेस ! त्या तरटापेक्षा तर ही माझ्या घरची गादी अधिक बोंचत नाहीं ना ? "

अगदी लडीवाळपणें मला बिलगून नंदिनी म्हणाली, " खरं आहे रे पांडोबा, पण संसारांत राहून तेवढीही चैन न करणं मला फार कठीण जातं आहे. कोचं खुर्च्या कांहीं मी आणल्या नाहींत—"

" आणि आणल्या असल्यास तर इथं जागा कुठं होती म्हणा !–"

" ऐक आधीं–जागा असती तरी मी आणल्या नसत्या. पण गादीचं मला वेड आहे. तुरुंगांत मी तरटावर पडत होतें पण तिथं ही जाणीव होती, कीं हा तुरुंग आहे. आतां हें घर—माझं घर–माझ्या घरीं मी कां हाल काढूं ? या इथल्या गाद्या—पण जाऊं द्या—मी नांवें ठेवीत नाहीं, पण मला वाटतं दहा बारा वर्षांपूर्वी केलेल्या आहेत या गाद्या. मागं इथं राहिलें त्यावेळीं—खरं सांगूं—या गादीमुळें मला झोंप लागेना. कसं जमिनीवर निजल्यासारखं वाटत होतं—" ती बोलत असतांच मधू आली तिला मी म्हटलें, " इकडे ये मधू, हें गादीपुराण ऐक—"

"हें काय ? ?" नंदिनी रुसव्यानें म्हणाली, "तिच्याकडे कशाला ही चर्चा ?"

स्प्रिंगच्या गाद्या समोरच होत्या. त्या मधूच्या नजरेला आल्यावांचून राहिल्या नाहींत, भुंवया वर चढवून डोळे फाडून ती उद्गारली " अस्सं, मलबार हिलवरच्या वैभवाचं हें ठिगळ इथं आलंय वाटतं !"

" तूं देखील असं म्हणूं लागलीस मधू ?" नंदिनी अगदीं काकुळतीला येऊन बोलली.

" आतां पहा," मी म्हटलें, " मधूलादेखील पटत नाहीं. हाच का तुझा ' कम्युनिझम ? "

" असं हिणवूं नकोस मला." नंदिनी उद्गारली. " वैभवाचं ठिगळ काय ! बरं आहे. तुरुंगांत राहून आलें आहें मी. बुटाच्या तळासारख्या भाकऱ्या जिथं पचवल्या तिथं एवढं नाहीं पचवतां येणार मला ? गादी गादी म्हणजे काय आहे ? ठीक आहे—" असें म्हणून ती एकदम जिना उतरून गेली.

मी अगदीं स्वस्थ बसलों होतों. पण मधू मात्र अस्वस्थ झाली. ती म्हणाली " असेना का गादी. कांहीं खोडी असतात माणसाला. कम्युनिस्टांनी अगदीं तरटावरच झोंपलं पाहिजे असं कांही लेनिननं सांगितलं नाहीं—"

हमाल घेऊन नंदिनी वर आली आणि त्यांच्याकडून गाद्या गिरद्या उचलून नेऊन खालीं गाडींत ठेवायला लावल्या. गाडीबरोबर गड्याला देऊन त्या मलबारहीलवर पाठवण्यांत आल्या.

" रागावलीस वाटतं ? " मधू नंदिनीला कवटाळून म्हणाली.

" नाहीं ग, " नंदिनी आपला हात तिच्या पाठीवर फिरवीत म्हणाली, " तसा थोडा राग आला होता पहिल्यानं—नाहीं असं नाहीं, पण आतां चूक कळली माझी. हो मुने घरासारखी, अशी म्हण आहे ना ? आतां असल्याच गाद्या आणून ठेवतें तिकडे बंगल्यांत. हीसुद्धां संवय केली पाहिजे !"

" माफ कर नंदू," मी म्हटलें, " मी जरा कठोर झालों खरा पण त्याला उपाय नाहीं. त्या तुझ्या स्प्रिंगच्या गाद्यांनीं माझी देखील कसोटी पाहिली होती. सारखा झोंपेंतून जागा होत होतों. त्या गाद्या बदलूं नकोस. मला देखील संवय झाली पाहिजे त्या वैभवाच्या ठिगळांची. "

" वैभवाचं ठिगळ !" नंदिनी आपल्याशींच पुटपुटत म्हणाली— " त्याच शब्दांनीं माझे डोळे उघडले. म्हणूनच माझा राग गेला. मधूला कळतं तेवढंसुद्धां मला कळूं नये अं !"

" जाऊं दे तें !" मी म्हटलें, "आतां त्या गोष्टीच नकोत हं मधू, आतां सांग, गेल्या आठवड्यांत कुठं नापत्ता झाली होतीस ? "

" नापत्ता झालें होतें खरी !" मधु हंसून म्हणाली, " माझा पत्ता लागला असता तर मी आज तुरुंगांत असतें. कांहीं सांगतां येत नाहीं तात्या. मोठी गंमत आहे या लपंडावाची. कशा आट्यापाट्या खेळतों आहोंत. केव्हां काय होईल तें सांगतां यायचं नाहीं. "

" सुरेंद्र कुठं आहे ? " नंदिनीनें विचारलें.

किती दिवसांनीं नंदिनीनें सुरेंद्राचा उल्लेख केला हा !

" असा माझ्यासारखाच धांवपळ करतो आहे. " मधू म्हणाली, " आतां त्याच्याखेरीज कोण राहिलंय—" मधूचा चेहरा अगदीं केविलवाणा झाला होता, " जीव अगदीं रडकुंडीला आला आहे आमचा. कसं हें निभावणार ? बुलेटीन कसं चालू ठेवणार ? आणखी किती तरी गोष्टी आहेत, पण काय करूं—मला कांहीं बोलतां येत नाहीं. वहिनीला सुद्धां सांगतां येत नाहीं. "

एक सुस्कारा टाकून नंदिनी म्हणाली, " केवढं जोखीम घेतलं आहेस हें मधू ? मी काय करतेंय् ? मऊ गाद्या शोधतेंय्—लाज वाटली पाहिजे मला. हें चिमुकलं फुलपांखरूं दिव्यावर झांप घालतं आहे अन् बहिरी ससाण्यासारखी मी स्वतःला समजत होतें, ती ही गाद्यागिरद्यांत तोंड खुपसून बसलें आहे. कांहींसुद्धां करतां येत नाहीं मला. "

" एक अपराध केलास ना ? " मधू म्हणाली, " तुरुंगांत गेलीस ना ? तुझ्यावर शिक्का बसला आहे आतां. कसल्याहि कारस्थानांत तुला आतां भाग घेतां येणार नाहीं. "

नंदिनीनें पुन्हां सुस्कारा टाकला. अंतरांतली खळबळ तिच्या चेहऱ्यावर दिसत होती. शून्य दृष्टीनें ती जमिनीकडे पहात बसली होती. अप्रस्तुत मातृवात्सल्याच्या दृष्टीनें मधू तिच्याकडे पहात होती. त्या दृश्यानें माझें भावनाहीन हृदय भरून आलें.

त्या दिवशीं संध्याकाळीं नंदिनी म्हणाली, " आज मी जेवण करणार. तशी मला भात भाजी करतां येते—शिवाय आचारी मदत करीलच मला. "

मधू हुरळून म्हणाली "बस, बस ! आज चैन आहे. आज घरच्या घरणीच्या हातचं सुग्रास जेवण मिळणार आम्हाला. केवढा भाग्याचा दिवस ! खरोखरीच आजचा दिवस मोठा महत्वाचा आहे. सारी मुंबई थरारून जाणार आहे आज."

"कां ?" मी विचारलें, "नंदू जेवण करणार म्हणून ?"

"नव्हे !" मधू म्हणाली, "आठ वाजेपर्यंत थांबा म्हणजे कळेल काय तें."

नंदिनी खरोखरच सैंपाकघरांत कामाला लागली. एका परीनें मला आनंद झाला. श्रीमंतीच्या दिमाखाला धक्का बसला.

मी विचार करूं लागलों, कां मला आनंद झाला ? मध्यम वस्तींतल्या कुटुंबाच्या संसाराचें चित्र पुरें झालें म्हणून ? संसारी जीवनाचा मला तिटकारा होता ना ! आज या संसारांत मी रंगून जात आहे. वर्तमानपत्र घेऊन मी बसलों आहें, मधू रेडीओशीं खेळत आहें, गड्याची गडबड सुरू आहे, नंदिनी चूल फुंकीत बसली आहे, आचारी तिला सामानाची तयारी करून देतो आहे आणि वर्तमानपत्रें वाचणें टाकून मी मधून मधून हें दृश्य न्याहाळीत असतांना माझ्या हृदयांत आनंदाचे फवारे उठत आहेत.

ही माझी अधोगति का ? हाच का माझा संसाराचा तिटकारा ? आणि हाच का नंदिनीचा साम्यवाद ? कुठें गेली ती कायदेभंगाची चळवळ ? काय झालें त्या मीरतच्या खटल्याचं ? तुरुंगांत डांबलेले ते सत्याग्रही काय करताहेत ?

अंतःकरणाच्या क्षीरसागरांत कुठून तरी मिठाचे खडे पडत होते. हृदय विवळत होतें. आनंद आणि अनुताप यांच्या झगड्यामुळें संसारी जीवनाच्या अभिलाषेची उत्पन्न झालेली नवी ठिणगी चमकत होती. त्या ठिणगीचा चटका हृदयाच्या कुठल्या तरी कोंपऱ्याला जाणवत होता.

तरीही आनंदाच्या कल्लोळांत मी हेलकावे खात होतों. त्या दृश्यानें मला मोहिनी घातली. मी सुन्न झालों. देहात्मभाव विसरलों. हा अधःपात कसा असेल ?—मी एकदम दचकून भानावर आलों.

"वहिनी, वहिनी, आधीं इकडे ये." मधू ओरडत होती, "इकडे

या तात्या, अगदीं कान टवकारून ऐक—"

नंदिनी आली--मीही उठून रेडीओजवळ गेलों तोंच —

तोंच रेडीओंतून ध्वनी आला, " महात्मा गांधी की जय "

काँग्रेसचा संदेश रेडिओतून ऐकूं येऊं लागला —

सरकारी रेडीओंतून काँग्रेसचा संदेश? काय झालें हें !

" हेंच तें !" डोळे मिचकावित मधू म्हणाली, " आतां समजलं? आतां कल्पना करा ! "

नंदिनी स्तंभित झाली. मलादेखील आश्चर्य वाटलें. हें कसें झालें? कुणी माणूस रेडीओ स्टेशनमधें घुसून मायक्रोफोनसमोर जाऊन बोलला का? इतक्या शांतपणें एवढा मोठा संदेश त्याला कुणी कसा देऊं दिला?

" चला–झालं ! " मधू म्हणाली, " एकदां गंगेला घोडे न्हाले ! आतां पुढं कांहीही होवो. "

मधूला मी कांहींच विचारलें नाहीं. मला माहीत होतें, कीं तिनें कांहीं सांगितलें नसतें.

सारखे तीन चार दिवस रोज रात्रीं आठ वाजल्यानंतर नित्याचा कार्यक्रम खलास होतां होतां काँग्रेसचा हा संदेश सुरू होत असे आणि तो ऐकूं आला कीं मधू आणि नंदिनी देहभान विसरून जात.

# १८

त्या तीन चार दिवसांत मधू जी सकाळीं नाहींशी होत असे ती संध्याकाळीं घरीं येई. तिचा तो उत्साह पाहून मलासुद्धां तिचें कौतुक वाटूं लागलें. नंदिनी मात्र अगदी उदासीन झाली होती. मधू कांहीं तरी उद्योग करते आहे आणि आपल्याला स्वस्थ बसून राहाणें भाग आहे, याचें नंदिनीला दुःख होत होतें.

एके दिवशीं सकाळीं बाहेर गेलेली मधू दहा वाजतां परत आली. रेडीओ स्टेशन पकडलें अशी जिकडे तिकडे आरडाओरड झाली होती. वाळकेश्वरवरच्या एका घरांत एरीयल आणि ट्रान्समिटर पोलीसांना सांपडला आणि त्यांनीं तो जप्त करून नेला.

तरीही मधू आली ती हंसत आली. मी म्हटलें, "अग तुझं रेडीओ स्टेशन पकडलं तरी तूं हंसतेस?"

"पहा तर खरी गंमत!" मधू चुटक्या वाजवीत म्हणाली. ती मोठ्या खुषींत होती.

मला आश्चर्य वाटलें. रेडीओ स्टेशन पकडल्याचा तिच्या मनावर कां परिणाम होऊं नये? मी खोदखोदून विचारलें पण ती थांग लागूं देईना.

दुपारचा रेडीओचा कार्यक्रम सुरू झाला आणि तो संपतांच महात्मा गांधीच्या जयजयकारांत कॉंग्रेस स्टेशन बोलूं लागलें. पोलीसांनीं ट्रान्समिटर पकडून नेल्याची हकीकतच सांगण्यांत येत होती.

मधूच्या आनंदाचें रहस्य आतां मला कळलें.

" आतां पहा ! " मधू म्हणाली, " कळलं ना ? असं आहे. कसं कावून गेलं आहे सारं पोलीस खातं. घरोघर रेडिओ हवे होते यावेळीं ! अजून लोकांना या रेडिओचें महत्व कळत नाहीं—" प्रचाराचें साधन या दृष्टिने रेडिओचें काय महत्व आहे यावर व्याख्यान द्यायला तिनें सुरवात केली. तें ऐकत असतांना नंदिनी हंसते आहे असें पाहून ती म्हणाली, " मी तुझ्यासाठीं बोलत नाही. मी तात्यांना सांगतेंयू. तात्यासारखा निर्बुद्ध प्राणी शोधूनसुद्धां सांपडायचा नाहीं. त्यांच्या डोळ्यांत जरा अंजन घलतें आहे. "

मधूनें आणलेला आर्जीबाईचा आव पाहून नंदिनी आणखी हसूं लागली.

आमच्या संसाराचा फुलबाग फुलून निघाला होता. तिसऱ्या आठवड्यांतसुद्धां आम्ही जागा बदलली नाहीं. नंदिनीच्या सगळ्या तक्रारी नाहीशा झाल्या होत्या—म्हणजे त्या तक्रारींची कारणें आम्हीं दूर केलीं, होतीं असें नव्हे, तर त्यापूर्वी वाटणाऱ्या साऱ्या गैरसोई तिच्या अंगवळणी पडूं लागल्या होत्या.

आचाऱ्याच्या हट्टामुळें त्या पुढला आठवडा नंदिनीला जेवण करणें बंद करावें लागलें. त्याबाबतींत मीही थोडासा आग्रह धरला.

सरकारी रेडिओ स्टेशननें, आपल्या कार्यक्रमाच्या आखणीत बदल करून वाव न ठेवल्यामुळें कॉंग्रेसस्टेशनचे संदेश बंद पडले, याचा मधूच्या मनावर फार परिणाम झाला. कॉंग्रेस बुलेटीन मात्र नियमितपणें सुरूं होतें. पोलीस जंग जंग पछाडीत होते पण त्यांना कांहींच पत्ता लागत नव्हता.

आमच्या संसारांत स्थायीभाव आला होता. आणि त्यामुळें इतर चार कुटुंबाप्रमाणें आमच्या संसाराचे व्यवहार संथपणें चालूं लागल्यामुळे नंदिनी अगदीं अस्वस्थ झाली होती.

पराक्रमशून्य जीवनाचा नंदिनीला तिटकारा होता. तिचे जुने साम्यवादी मित्र पूर्वीप्रमाणेंच चर्चा करीत बसले होते—पण नंदिनीकडे येण्याचें त्यांनीं अजिबात बंद केलें होतें.

मधून मधून आम्ही तिघेंही मलबार हील्वरच्या बंगल्यांत राहायला जात असूं. पण आतां तिथें कोणाचेंच मन रमत नसे.

मधू आतां कॉलेजांत जाऊं लागली होती. तरीही पडद्याआडच्या

काँग्रेसच्या कामांत तिचा हात अजूनही होता, असा मला संशय होता. माझ्यासमोर ती कांहींच बोलत नसे पण नंदिनींच्या आणि तिच्या ज्या कानगोष्टी चालत, त्यावरून मी अटकळ बांधीत होतों.

निष्प्रेम जीवनाची पूर्वीची माझी आवड आतां नाहीशी झाली होती. प्रेम आणि वात्सल्य या दोहोंच्या भरपूर पुरवठ्यामुळें माझें जीवन भरगच्च झालें होतें.

एकलकोंडेपणाची माझी वृत्ती आतां कुठें गेली, याचा माझा मलाच पत्ता लागत नव्हता.

पण या शांततेच्या संसारांत मला उणीव वाटूं लागली. मधल्या काळांतल्या खळबळींमुळें जीवनांत जें एक चैतन्य आलें होतें तें पुन्हा अनुभवायची हांव सुटूं लागली.

नंदिनीचीही मनःस्थिती तशीच झाली होती. दहा माणसांच्या घोळक्याची उणीव जरी एकटा मधू भरून काढीत असे तरी तें गडबडीचें आयुष्य पुनः अनुभवण्याची लालसा नंदिनीच्या अंतःकरणाला सारखी चेतवूं लागली होती.

एके दिवशी सुरेंद्र आला तेव्हां आम्हांला सर्वांनाच आनंद झाला. त्यानें बातमी आणली होती तीही आनंदाची. डॉ. महमूद या नांवाचे एक साम्यवादी गृहस्थ रशियांतून नुकतेच हिंदुस्थानांत आले होते. त्यांच्या आगमनानें स्वस्थ बसलेल्या साम्यवादी तरुणांत चैतन्य उत्पन्न झालें.

सुरेंद्राबरोबर नंदिनी डॉ. महमूद यांना भेटून परत आली त्यावेळीं तिची चर्या बदलली होती. तिच्या चेहऱ्यावर अनिवार अस्वस्थतेचें तेज झळकूं लागले होतें. मधल्या काळांत आलेली ग्लानी — त्या ग्लानीमुळें आलेलें संसारिक सुखासीनतेचें जडत्व, कुठल्या कुठें नाहीसें होऊन गेलें होतें.

नंदिनी उद्योगाला लागली. जोडीला मधू होताच. सुरेंद्राच्या खेपा वाढूं लागल्या. आणखीही माणसें येऊं लागलीं. नंदिनीच्या बंगल्यांत मी पहिल्यानें जात होतों त्यावेळच्या इतिहासाची पुनरावृत्ती सुरू झाली.

मी बाजूला पडूं लागलों. पूर्वीं मला तें जाणवत नसे--किंबहुना त्याचा आनंदच वाटे—पण आतां माझ्या अंतःकरणांतील पतिभाव जागा

होऊं लागला.

सारीं जणें आनंदाच्या कल्लोळांत पोहत होतीं.

मला काय वाटत होतें ? तें असमाधान होतें का ? तो मत्सर होता का ? भंग पावूं पाहाणाऱ्या संसाराच्या तटबंदीतील त्या विटा निखळत होत्या का ?

कोण हा डॉ. महमूद ?

डॉ. महमूद म्हणजेच एस्. एन्. रॉय—लेनिनचा एक हस्तक—हें मलाच काय पण साऱ्या हिंदुस्थानाला कळायला फार अवधि लागला नाहीं.

* * *

त्याच वेळीं आम्ही आमची जागा बदलली आणि भानगड गल्लींतून आम्ही लॅबर्नम रोडवर राहायला गेलों.

कां ?

ॐ तत्सत्



**नलिनी**:—इश्श ! हें काय दुकान आहे कीं काय आहे? मेली मनासारखी वस्तु मिळेल तर शपथ ! मधुकर तर कलकत्त्याहून रविवारीं येणार. आणि माझा हा मोर तर अजून भरायचाच आहे. काय म्हणतील ते मला?

**मंजुळा**:—कशाला इतका त्रास करतेस? फुकट राहिलीस इतकीं वर्षे मुंबईत ! कुठलं सामान कुठं घ्यायचं हें तुला कळत नाहीं !

**नलिनी**:—मग, कुठं मिळेल हें भरतकामाचं सर्व सामान ?

**मंजुळा**:—हें बघ ! ही जाहिरात वाच **मामांच्या** या नव्या कादंबरींतली.

**नलिनी**:—पाहूं ! पाहूं ! ( वाचते )



# एम्. मधुकर आणि कं.

| **ब्रँच** | **हेड ऑफिस** |
|---|---|
| **गवालिया टँक,** | **दादर** |

